श्री 1648

# वामनादिकवींचे श्लोक.

## नृहरिदर्पणे वामन कृत नृसिंहावतारचरित्र प्रारंभः



श्लोक.

ळनीवृत्त.— नरहरिहरिरूपें क्रूरदैत्या विभक्ता। परमसकलभशांत श्रीकरस्वात्म भक्ता॥ स्वचरणाशरणातें सौम्य ही शीघ्र तो कीं। जननि भयमनींका मानिजें व्याघ्र तो कीं॥ १॥

विलंबित.— नरतनू सुरखउत्कट केसरी। कटिन शीं पिंवळा पट केसरी॥ परमसौम्यरमा ह्रदयांबुजीं। मज असे वरुषे स्वदयांबुजी॥ २

ळनी.— जयविजय असे ते जावळे दोदितीचे। असुर इतर जाले पुत्रपौत्रादितीचे॥ प्रथम नि उपजे तो धाकुटा बंधु होतो। धरणिधर वराहें मारिला बंधु होतो॥ ३॥

ंगप्रयात.—बुडे क्ष्मा तयीं उद्धरी जो क्षमेला। तया क्रोडरूपें हिरण्याक्ष मेला॥ तया दूसरा ज्येष्ठ त्या अग्र जाला। मनीं क्रोध उत्पन्न अत्युग्र जाला॥ ४॥

ाता.— तो हिरण्यकशिपु प्रियभावा। कारणें निजनमो गुणभावा॥ दारवी त्वरित ठोकुनि मांडी। द्वेष विष्णुचरणाप्रति मांडी॥ ५

ळनी.— अजर अमर काया आपुली तो कराया। नप करि वरमागे धातया लोकराया॥ न मृति मज ह्मणे हो चे न ना चे न नाहीं। मरण हरिं असें कीं दीसरा नींत नाहीं॥ ६॥

ता.—त्यावरें अमर मानव लोकीं। स्वामि तो चि फळ हें अवलोकीं॥ देववृंद अवघा चपळाला। भीति सर्व हि तया चपळाला॥ ७॥

द्र...ना.— ते देव ही प्रार्थिति देवदेवा। कीं आपुलें घेप ददेव देवा॥ झाली ...हबुद्धि अधीर वाणी। तों बोलिली हो अशरीर वाणी॥ ८॥ कीं हा तपें ...शुनि अजजाला। त्याच्यावरें सर्व अवध्य जाला॥ तथापि मारीन

चिदुर्धराया । गांजीलमाझ्याजथिंभक्तराया ॥ ९॥ प्रल्हादत्याचा-
कृतत्याकुमारीं । घडेजयांहूंषमुकुंदमारी ॥ केव्हां असेंहोयिलही-
असोसी । दुःखेंबहूतोकरवृंदसोसी ॥ १०॥ ऐसीप्रतीक्षात्हृदयां-
तदेवा । तोदैत्यत्या भागवतासदेवा ॥ पुरोहितांच्यासदनींचठेवी ।
तेथींकवीती अतितीव्रठेवी ॥ ११॥ एकेदिनींघेकृतदैत्य अंकीं । तो
स्नेहत्याचागणवेन अंकीं ॥ पुसेतयाभागवतोत्तमातें । कीं आवडे-
जेंतुजसांगमातें ॥ १२॥ प्रल्हादबोलेसदनत्यजावें । तपोवनालागिं अगत्यजावें ॥ तेथेंभजावेंहरिच्यापदातें । जो आपदातेंहरिदे-
पदातें ॥ १३॥ दैत्येश्वरा आवडिहेंचिमातें । कींसेवणेंश्रीपुरुषो-
त्तमातें ॥ त्यजूनिविष्णूसभजेगृहातें । तो आपलानाशकरीस्वहा
तें ॥ १४॥ दुःखार्णवींजो धरिकासयाची । चिंतातयालामगकासया
ची ॥ नथीसरावेंचिकदापित्याला । प्रल्हादइत्यादिवदेपित्याला ॥ १५

द्रुतविलंबित.— परिसता असुरेश्वरहासिला । मगह्मणेकवणेंशि-
शुनासिला ॥ शिकविलेंबरवें अथवाजसें । वदतितेंचिमुलें अभि
राजसें ॥ १६॥

भुजंग०— ह्मणेहाकरावा गुरूनेंविचार । स्वयेंठाउकेलेंकुशकायचार ॥
हरी आमुच्यावाइटाचाभकेला । तयाच्याजनीं हाकुळीं भेदकेला ॥
१७॥ गुरूनें असेंदैत्यसांगोनिधाडी । तयागोष्टिहे वाटलीदेवधा-
डी ॥ भिऊनीमनीतर्कनानाकरीती । तयापूसतीविप्रसामादिरीती ॥ १८

शिखरिणी.— अरेहेंप्रल्हादागुरुपुसतिकोठूनिशिकसी । कसीहोतीप
ज्ञात्यजुनितिसतूंस्वैरठकसी ॥ स्वयेंतूझ्यापोटामधिल अथवाबु
द्धिउकळी । कळीत्वत्पक्षाचीउगवलिकळीघेउनिकळी ॥ १९॥ ह्मणे
श्रीप्रल्हादस्वपरह्मणजे भ्रांतिउकळी । कळीईच्यामूळें असुर अम-
रीं आणिसकळीं ॥ कळीत्वत्पक्षाचीउकलिलकसीमोहरजनी । ज
नींऐशामूढींमतिनधरितांविष्णुभजनीं ॥ २०॥

मालिनी.— स्वपरह्मणुनिज्याचीमोहितेस्वैरमाया । स्ववशकरिति-
लाजोषड्गुणालीरमाया ॥ नमितनमिभगवंताजो तुह्मा आकळेना ।
स्वपरकुमतिभेदेंतोनिआत्माकळेना ॥ २१॥ शिळाचुंबीलोहभ्रम-

निनिसयेतांचिजवळी । वळीनेंसीमाझीमतिहि हरिनेंत्यासकवळी- ॥ वळीपोथ्याच्यात्यातुह्मि असुररीतीनोशिकविना । विनाव्यर्थेंकाव्यें अलवणहरीवीणकविता ॥ २२॥

इंद्रवज्रा .– प्रल्हादबोलोनिअसेंहिजाला । जालाउगाध्यानअधोक्ष- जाला ॥ पुढेंनबोलेचिपुरोहितानें ॥ तानेंदिलाधाडुनिजोहितानें ॥ २३॥ नोबुद्धिकोपेंखवळेद्विजाची । जाचीह्मणेटाकिकथा अजाची ॥ बाप्पूळहेचंदनकाननाशीं । नाशीलभेदूनिनिरंजनाशीं ॥ २४॥ प्रल्हादहाविष्णुकुठारदंड । दंडप्रसंगीं असुराउदंड ॥ दैत्यांचियाचं दनकाननाशीं । नाशीलभेदूनिनिरंजनाशीं ॥ २५॥

भुजंग०– भविष्यानुरूपेंवदेविप्रवाणी । नसेतर्जनाभर्जनालागिवा- णी ॥ असेंदंडदुःशब्ददंडेंकरीती । पुन्हाशीकवीतीनयालोकरीती ॥ २६

इंद्रवज्रा .– बापासितोभेटवितांसुतानें । तानेंनिजांकावरिसुव्रतानें ॥ घेतांसुखाचीनदिसेचिवाणी । वाणीवदेमानसमंजुवाणी ॥ २७॥

वसंततिलका .– बाशीकलासिगुरुपासुनिजोपसारा । साराअसोतु जरुचेवदत्याचसारा ॥ गोष्टीवदेकुशलयावरिज्यापित्याला । त्या लागतीलमधुरानकदापि त्याला ॥ २८

मालिनी .– श्रवणहरिकथेचेंकीर्तनींगानजावें । स्मरणचरणसेवाअ- र्चनींही भजावें ॥ नमनकरुनिदास्येंसख्य आत्मार्पणानें । करि तितरतिवारेसारहें आपणानें ॥ २९ ॥

पृथ्वी .– हिरण्यकशिपुस्वयें परिसतांअशीवैखरी । ह्मणेगुरुसुतातु झीकपटमित्रताहेखरी ॥ पुरोहितह्मणेनमीनजनअन्यहाभावदे । अजीसहजबुद्धिहे तवकुमारजेंजें वदे ॥ ३० ॥

द्रुतविलंबित .– गुरुमुखेंनअरेजरिशीकसी । कुमतिउद्भवलीतुज- हेकसी ॥ सुतह्मणेविषयांतसदापित्या । असिनबुद्धिनरासिक- दापित्या ॥ ३१॥

स्वागता .– सारमानितअसेविषयातें । विष्णुभक्तिगमतेविषयातें ॥ नस्वयेंहरितयाप्रियवाटे । बोधिलातरिनयेनिसुवाटे ॥ ३२॥

[illegible]जाति .– सर्वप्रयत्नें भजतीगृहातें । नसेविती भागवतामहातें ॥

गृहव्रतीतेमतित्याजनांची। नगोष्टिही घेभवभंजनाची ॥ ३३॥

इंद्रवज्रा .— हेतोगुरूपापतरूह्मणावे। अंधासवें अंधनसेगणावे॥ देप्रीतिकृष्णींगुरुतोचिसाच। श्रुत्यर्थइत्यर्थअसे असाच ॥ ३४॥

उपजाति .— पशूजसेचाविनिचाविल्यातें। पुनःपुन्हासेवितिसेविल्या तें॥ कृष्णींनव्हेप्रीतिकदापित्याला। प्रल्हादइत्यादि वदेपित्याला॥ ३५

भुजंग० — असावर्णितांवर्णितांश्री अजाला। पित्याच्याच अंकीं समाधिस्थजाला॥ अहोतोनिजांकावरूनी अभाग्यें। दिल्हालोटुनील भ्यजोपूर्वभाग्यें॥ ३६॥

इंद्रवज्रा .— याचावधीजोचुलतासखारे। ह्यात्यासपूजीतुह्मियासरवारे॥ दानेंनखेंपर्वतनशस्त्रपातें। माराह्मणेसत्वरनिरूपातें॥ ३७॥ मीबापमाझीनलगेचमाया। तोआवडेविष्णुकुळाधमाया॥ हेंपांचवेंवर्षचियाकुमारा। तोंहा असा सत्वरयासमारा॥ ३८॥

उपजाति .— तेमारितीबापह्मणेचमारा। मारानलागेनरित्याकुमारा॥ नतोडितेंखड्गरूतेनभाला। भालागतेकींनमहोनभाला॥ ३९॥ न अग्निहीमाजि अहोजळाला। नमग्नहीतोकरवेजळाला॥ उरावरी-आदळिपर्वतानें। केलेउपायांतर सर्वतानें॥ ४०॥

वसंततिलका .— चिंतार्णवांतबुडतां असुरोत्तमानें। वाटे तदा मरणयाचिनिमित्तमानें॥ तोंनीतिनेंकरितिने द्विजबोधराया॥ कींबाळ हेंचिनयोग्यमनींधराया॥ ४१॥ राजाह्मणेमगतयाचपुरोहितानें। कींयासन्यास्वसदनींशिकवाहितानें॥ ऐसाकराखरिनकीं-धरिलोकरीती। नेऊनितेद्विजघरासनसेंकरीती॥ ४२॥

इंद्रवज्रा .— तेथेंमुलेंजींगुरुगेहवासी। तींयोजिलींसर्वजगन्निवासीं॥ त्यादैत्यबाळागुरुहाचिजाला। जोदाखवीत्वात्मसुखींअजाला ४३

उपजाति .— मुलांसत्या विस्मयथोरवाटे। कींलागलाहाचिकसास्रवाटे॥ तेपूसतीहेंतरियाद्विजाला। गवेंनतूतेंगुरुकोणजाला॥ ४४

द्रुतविलंबित .— उमजलामजलाहरिज्यामुखें। गुरुचतोरुचतोत्वदयींसुखें॥ शिकवणेंकवणेंमजत्याविना। निजपणींजपणींजडदाविना ४५

उपजाति .— दैत्यार्भकांहाहितशब्दवाटे। समस्तहीलागतित्याच्यम-

वाटे ॥ हें सर्वही आथिकतोंचि ताते । पाचारिलें क्रोधवशेंसुता तें ॥ ४६ ॥ गालिप्रदानीं न करूनि वाणी । वाणी वदे हो अपवित्र वाणी ॥ म्हणे खला दैत्यकुळाधमा तें । मारीन जो तूं न भिशी च मा तें ॥ ४७ ॥

इंद्रवज्रा. — मी क्रुद्ध होतां मज लोक सारे । भीती भिशी एक न तूं कसा रे ॥ या शासना लंघिशि दुर्गमातें । कोण्या बळें सत्वर सांग मातें ॥ ४८ ॥ प्रन्हाद बोले जग गांजितोसी । त्याच्या बळें आत्मपणें जिंतोसि ॥ रक्षी अनाथा मजला हरी तो । ज्याला असा बापचि सं हरी तो ॥ ४९ ॥

वसंतति॰ — माझें तुझेंचि बळ तो इतुकें चि नाहीं । त्याचें च कीं बळ असे सकळाज नाहीं ॥ तूं शत्रु मानिशि तया असुरस्वभावें । तो टाकिशील मग देखसि आत्मभावें ॥ ५० ॥

उपजाति. — या गोष्टिनें फार चितप्त जाला । घे खड्ग बोले मग आत्मजाला ॥ कीं तूं मरूं इच्छिशि तो निपात । स्वयें असें बोलसि सन्निपात ५१

द्रुतविलंबि॰ — त्रिभुवनेश्वर जो मज वेगळा । तुज गमे सकळाहुनि आगळा ॥ जरि दिसेल अरे मज ईक्षणीं । वधिन त्याचि पुढें तुज ये क्षणीं ॥ ५२ ॥ जरि समर्थ असेल तुझा धणी । तरि तुझी पुरवील चि तो धणी ॥ परि वदे स्थळ कोण तया असे । म्हणुनि गर्जत शब्द करीन असे ५३

घनाक्षरी. — प्रन्हादाशीं दैत्य थोर ॥ म्हणे मज थोर थोर ॥ भीति बोलतां समोर ॥ भें न वाटे तूं जन्मा ॥ तूं ना तरुण किशोर ॥ पांचा वरुषांचें पोर ॥ म्हणशी साजण हे चोर ॥ नाग विनी मजला ॥ बोल बोलशी निरवट ॥ मरों पाहसी फुकट ॥ मृत्यु आलासे निकट ॥ नाहीं तूज समजला ॥ तुझा मी प्रत्यक्ष काळ ॥ हाका मारून विशाळ ॥ अरे तुझा रक्षपाळ ॥ लपे जाणों लाजला ॥ ५४ ॥ अरे तुझा कोठें देव ॥ म्हणे सर्व वासुदेव ॥ विश्वपटीं स्वयमेव ॥ तंतू तोचि वसतो ॥ दैत्य म्हणे अरे थांब ॥ गोष्टी ठेवी लांबलांब ॥ मज समोर हा खांब ॥ ये थें कैसा असतो ॥ म्हणे स्तंभ दारुरूप ॥ दारूमध्यें चित्स्वरूप ॥ थीजलें तथापि तूप ॥ रसतो न भासतो ॥ नरि दिसेना कां मज ॥ म्हणे भजोनी समज ॥ प्रत्यक्ष

ही अधोक्षज ॥ दिसेना तो दिसतो ॥५५॥ स्तंभीं दिसतसे जाण ॥ ऐसें बोलतां सक्रजाण ॥ दैत्यें घेतलें उड्डाण ॥ सिंहासनावरूनी ॥ खवळलाउन्क्षुं खळ ॥ दांतें दांत खायखळ ॥ ह्मणी खांबासी निखळ ॥ खड्ग मुष्टी धरूनी ॥ तेंचि समयीं कठोर ॥ बहु भयंकर थोर ॥ ध्वनी उठे महाघोर ॥ मोळ्या बळें करूनी ॥ ह्मणे असुर विकळ ॥ कोण गर्जतो प्रबळ ॥ पाहे चहूंकडे चळ ॥ लोचनासि पसरूनी ॥ ५६॥ ध्वनी उठला अखंड ॥ व्यापी द्वीप खंड खंड ॥ वाटे करी खंड खंड ॥ ब्रह्मांड विदारूनी ॥ दिग्गजांचे चंड चंड ॥ भग्न होती शुंडादंड ॥ लेंडे टाकिती उदंड ॥ पायु वायु सारूनी ॥ भ्याले दैत्य भंड भंड ॥ दानवेंद्र मुंड मुंड ॥ होती त्यांचे पिंड पिंड ॥ रोमांच उभारूनी ॥ रात्रिंचर रक्तभंड ॥ झाले थंड थंड थंड ॥ जेव्हां सिंह रणशौंड ॥ निघे हाक मारूनी ॥ ५७॥

शिखरिणी. — असे रे तो कोठें नृज बहु जयाचे भरवसे । बसे सर्वां ठायीं स्थिरचर पटीं तंतु गवसे ॥ दिसेना कां स्तंभीं मज दिसतसे तो नरहरी । हरी तो दुष्टाचे त्वरित मद जो एकचि हरी ॥ ५८॥ असे स्तंभीं ऐसा श्रवणिं पडतां शब्द असुरा । सुरापानीं मत्त स्वहित विषयीं जो निदसुरा ॥ सुराधीशद्वेषें करुनि दृढ खड्गें क्षयकरें । करें हाणी मुष्टी वळुनि खळ खांबास निकरें ॥ ५९॥

स्वागता. — स्तंभ तो अवचिता चिकडाडी । अब्जजांड अवघें चिकडाडी ॥ अब्जजादि हृदयांत धडाडी । काळमेघ शतनाद गडाडी ॥ ६०॥

उपजाति. — खरी कराया निज भृत्य वाणी । आणी स्वकीं व्याप्ति सहीन वाणी ॥ स्तंभीं सभे अद्भुत रूप दावी । मनुष्य नासिंह तनू वदावी ॥ ६१

घनाक्षरी. — मुख सिंहाचें उत्कट ॥ नरतनू जे विकट ॥ होय नरसिंह प्रकट ॥ विधि वर रक्षणीं ॥ बाहू बहू चंड चंड ॥ काळदंडसे उदंड ॥ ज्वाळा तोंडांत अखंड ॥ चंडरश्मी ईक्षणीं ॥ नखें वज्रें शीं तिखट ॥ दातीं शब्द खट्ट खट्ट ॥ जीभ चंचळ चोखट ॥ जाणो खड्ग दक्षिणीं ॥ कुंडलें मंडित गंड ॥ अंगीं बाणलें श्रीखंड ॥ हृदयाचें खंड खंड ॥ दैत्याचें तया क्षणीं ॥ ६२॥

द्रुतविलंबित. — मनुजरूप नव्हे नरकेसरी । कनकवर्ण कटीं पटकेसरी ॥

सकलसृष्टि करून शकेसरी। प्रकट होय असा नरकेसरी॥ ६३॥

मालिनी. — पसरटमुखमोठें आंत दाढा कराळा। परमचपळजिव्हा खड्ग जैसा निराळा॥ नयनयुगुल जाणों तापलें हेमपाणी। बहु भुज नखशस्त्रें देखिला चक्रपाणी॥ ६४॥

उपजाति. — सिंहावरीत्या मग दैत्य हस्ती। धांवे गदा घेउनि थोर हस्तीं॥ पतंग अग्नीवरि जेवि जातो। हाणी गदा घोर अधोक्षजातो ६५

द्रुतविलं॰ — विधिवरप्रतिपाळक जो हरी। न दिवसांत निशींत हि संहरी॥ ह्मणुनि युद्ध निशामुखिं तो करी। मग वधी बुडतां रवि लोकरी॥ ६६॥ अमरतो मरतो अति लोकरी। चपळतो पळतो धरितां करीं॥ उखळला खळ लाघव लक्षणीं। विलपती लपती सुर त्या क्षणीं॥ ६७

वसंततिलका. — आश्चर्य हें नृहरि मानुनि या महास्यें। सक्रोध हास्य करि उत्कट अट्टहास्यें॥ तों झांकले नयन भीति मनीं निघाली। मांडीवरी हरि अशास धरूनि घाली॥ ६८॥

द्रुतविलंबित. — न धरणीवरि मृत्यु न वा नभीं। वर असा ह्मणवूनि च तो नभी॥ निजनखें वर त्या खळ शेखरा। चिरि धरूनि करी वर तो खरा॥ ६९॥

भुजंगप्रयात. — न गेहीं न बाहेरि याला गिं दारीं। बसे उंबरा पोट त्याचें विदारी॥ सजीवें अजीवें मरे ना न साची। चिरूनी नखें तो करी गोष्टि साची॥ ७०॥

द्रुतविलंबित. — चुळबुळे निसटे करितां नडी। असुर तो हरि काढुनि आंतडीं॥ उदर फाडुनि घालि नसे गळा। करि सुमंगल देव अमंगळा॥ ७१॥ चिरूनि वारण गंड जसा हरी। असुर मारुनि शोभन से हरी॥ दितिज तो गज केशव केसरी। इतर साम्य करून शकेसरी॥ ७२॥ दितिजयूथप जो मृनि पावला। असुरवारणयूथहि धांवला॥ मृतक नें दकळूनि धरा नळीं। वधित या हरि त्या न बुक्या नळीं॥ ७३॥ पदतळें कितिएक नखें करें। तुडविले दनुजेंद्र भयंकरें॥ असुरनाथनृपासन त्यावरी। हरि बसे परि कोप न सांवरी॥ ७४॥ स्तविति देव अजीकन कांबरा। असुरमा

रियला ह्मणती बरा ॥ परिन आवरि कोप रमापती । सप्तयलोक चतुर्दशकांपती ॥ ७५ ॥

स्वागता. — प्रार्थिनां अमर सागरजाते । सावरूनि कनकांबर जाते ॥ जाय पाड किनि एकरमाते । तो गमे भय चराचर मातें ॥ ७६ ॥

द्रुतविलंबित. — परतनां कबरांबर नावरे । पद रही ह्रदयावरि वावरे ॥ स्मरण भावनशी प्रतिचा वळे । नयन चंचळजी भ्रहि चावळे ॥ ७७ ॥

शिखरिणी. — मग प्रल्हादानें ह्मणति अवघे भक्तपरमा । रमाब्रह्मा-शिवन्मस्वक्रूल विभ्रकोपाभ्युपरमा ॥ रमाकांतायेना तुजविण रूपा दैत्यदमना । मनाच्या विश्रामा त्वरित करिगा कोपशमना ॥ ७८ ॥

उपजाति. — ज्याला भिती देवविरंचिपद्मा । प्रल्हाद त्याच्या धरि पाद पद्मां ॥ जो वंदिला वंदित सर्वभूतें । करी नयादंडवत प्रभूतें ॥ ७९ ॥

स्वागता. — बाळकें स्वचरणांबुरुहातें । वंदितां प्रभु जगद्गुरु हातें ॥ ऊचलोनि अवलोकुनि ठेवी । मस्तकीं अभय हस्त कठेवी ॥ ८० ॥

शिखरिणी. — करस्पर्शे जालें परम सुख त्या दैत्यतनया । नया संसाराचें स्मरण उरलें त्यासु विनया ॥ नयानेत्रीं दोहीं स्त्रवति न निघे-शब्द सगळा । गळा दाटे प्रेमें त्वरित हरिघे मोहुनि गळा ॥ ८१ ॥

वसंतति० — प्रल्हाद त्या उपरि होउनि सावधान । प्रेमें स्तवी त्रिभुवने-शदयानिधान ॥ ब्रह्मादि सात्विक तया कळसी न देवा । मी तो ह्मणे असुर राजस वासुदेवा ॥ ८२ ॥ भक्ती करूनि तुज गाय अधोक्षजाला । जाला शिवूं स्वपददायक त्यागजाला ॥ मारूनि नक्र गति देद्विरदा नयाला । याला गिमी स्तवितसें वरदा नयाला ॥ ८३

भुजंगप्रयात. — मुखांतूनि नक्राचिया कुंजराशी । जसें सोडवीलें कृपा पुंजराशी ॥ मला सोडवीलें तसें वासुदेवा । पित्याच्या करापासुनी वासुदेवा ॥ ८४ ॥

उपजाति. — प्रल्हाद इत्यादि करी स्तुतीतें । अर्पी नृसिंहास सरस्वतीतें ॥ कृपा तया ऊपरि देवदावी । यानंतरें तें चि गमे वदावी ॥ ८५ ॥

इंद्रवज्रा. — ऐशा स्तुतीनें हरि तुष्ट झाला । बोले कृपेनें असुरात्मजाला ॥ कीं वर्णितां या निगमागमातें । संतोषलों मी वर मागमातें ॥ ८६

शिखरिणी०— ह्मणेश्री प्रल्हाद प्रभुवचन हें लोभकर जी । रजीं मातें घा लीं ह्मणि ह्मणुनियां शब्दखरजी ॥ रजीं यापायांच्यासुखकवण नाहीं भज हरी । हरीदुःखें सारीं नवगुणकथा श्रीनरहरी ॥ ८७ ॥

स्वागता०— अंतरींधरुनिपूर्णनिरीक्षा । पाहतोसिनिजभृत्यपरीक्षा ॥ अन्यथास्वजनभाववचनाशी । कांवदेकरुणयावचनाशी ॥ ८८ ॥

इंद्रवज्रा०— स्वामीसजोवेंचितुकाम्यवाणी । वाणिज्यतेंभक्तिहिदीनवाणी ॥ वाणीचकीं सेवक वेतनाचा । निष्कामतोपंथपुरातनाचा ॥ ८९ ॥

द्रुतविलंबित०— ह्मणसि मागचि जींकमलावरा । त्वरितदेतरियाअमलावरा ॥ किमपिहीउपजेंचन कामना । करि असें विधिच्या जन कामना ॥ ९०

इंद्रवज्रा०— प्रल्हादशब्दीं हरितुष्ट लाहो । ध्यावाह्मणेआजियथेष्ट लाहो ॥ लक्ष्मीपतीनें मनमोहरीतो । बोली अशा त्यासवदेहरीतो ॥ ९१ ॥

वसंततिल०— ऐसेंतथापिजिससिंधुचियाचपाळीं । पाळीस्वभूमिफळहेंतुझियाकपाळीं ॥ पाळी तुझी ह्मणुनि सर्व वसुंधराया । राया तुझ्या इतर योग्यनव्हे धराया ॥ ९२ ॥

शार्दूलविक्रीडित०— एकाहत्तर चौकड्या कलियुत त्रेतायुगद्वापरीं । हें मन्वंतरएककाळ इतुका जो होययाऊपरी ॥ प्रल्हादाइतुकीं युगें अधिकही कांहींतुझ्याशासनीं । पृथ्वीसर्वभ सोह्मणे नरहरी ये बैससिंहासनीं ॥ ९३ ॥

इंद्रवज्रा०— स्वामाजिमाझी स्मरहे कृपाकीं । यापूर्विल्यापातकपुण्यपाकीं ॥ उद्विग्नदुःखींनसुखींस्पृहाही । ऐसें असावें अनिनिस्पृहाही ॥ ९४

शिखरिणी०— स्पृहाहीं त्यागेंसुख असुखहीं भोगभलता । लताप्रारब्धाची अशिच जरिनांदी कुशलता ॥ वदे प्रल्हादानें हरिकुशल भोगासमजगा । जगामध्येंऐसें तुह्मिसकळमद्भक्तमजगा ॥ ९५ ॥ जडींहीं चिद्रूपाकपटपट तंतू समजगा । जगामध्येंपाहे धरिसुमनहारानभजगा ॥ जगाया यालोकीं भजनगुणगातोसननरे । नरेन्या

त्या पायें जन भवनदी पार उतरे ॥ ९६ ॥

इंद्रवज्रा०— दे मुक्ति ही भक्ति हि भक्तराया । दे भक्ति ही अन्य जनां नराया ॥ प्रल्हाद मायां धरि शासनातें । अंगीकरी नातरि पासनानें ॥ ९७

द्रुतविलंबित०— स्वपितयास नव्हे अधमागती । ह्मणवुनी विनवी शिशु मागती ॥ हरि ह्मणे कृतज्ञ्यास असा असे । कुगति पावति पातकिही असे ॥ ९८ ॥

स्वागता०— एकवीस निज पूर्वज सारे । उद्धरी कृत वितां तुज सारे ॥ सत्क्रिया करितथा पितयाची । त्यान नूचिरिलि ज्यापितयाची ॥ ९९ ॥ ये रितीं निज कृपा अवलोका । दावुनी नरहरी निजलोका ॥ जाय हें चरित लोक तराया । ठेविलें भवनदी उतराया ॥ १०० ॥ भक्ति मुक्ति असि दारव विभक्ता । वामनें मन नया अविभक्ता ॥ अर्पिनां करुनि अर्पण सारें । पाहतां नृहरिदर्पणसारें ॥ १०१ ॥

इति वामन विरचितो नृहरिदर्पणः संपूर्ण.

---

## ऋषिपत्न्याख्यान प्रारंभः

### श्लोक.

शिखरिणी— सलज्जांचीं लज्जा हरि परिहरी आश्रमजनीं । असीं गोपी वस्त्रें हरुनि नग्न दानी शमजनीं ॥ स्वभक्तां नारी ही नर न भजती या हरिवर । हि जरि प्रेमें हें स्फुटकरि न मूर्त्यायदुवरा ॥ १ ॥ ह्मणूनी गोपींचीं वरद वसनें जें हि निहरी । हि जरि भक्ती हीं प्रकट दिवसीं त्या करि हरी ॥ स्वकांतां तें विप्र स्त्रीयांन निजाधिक्कार कथितो । कथाब्धी मध्यें या चतुर जन जेणें समथिनी ॥ २ ॥

मालिनी— करुनि नमन कृष्णातें कथा तत्व याचें । कथिन गुण हि कांहीं त्यामधें माधवाचे ॥ न भजत हरि जाल्हे भ्रष्ट थोर द्विजाती । प्रिय हरि अबलांतें त्याच मुक्तीसि जाती ॥ ३ ॥

स्वागता— अंबरें हरुनि जीं वरदानें । गोपिकांस दिधलीं वरदानें ॥ धांवले सपश गोवळ मारे । काय हा जन ह्मणे वळ सारे ॥ ४ ॥

भुजंगप्रयात:— शिदोऱ्यान घेतां चिदाकूनि जाती । सवें आपलाल्या चतुष्पाद जाती ॥ मिळायाखरेनें मृगांकाननातें । असे धांवलंगोपतें काननातें ॥ ५॥

मालिनी:— हरिहि बहु पहातें दूर गेला वनातें । ह्मणउनि पशुपाळीं मांडिलें धावनातें ॥ जसि दिल्हि गमनाज्ञा गोपकन्यांस देवें । चहुंकडुनि मिळाली गोपवृंदें सदेवें ॥ ६॥

स्वागता:— जायत्यांसह हरी परभारा । दाविनद्रुम शिरीं परभारा ॥ हे ह्मणे तरु परार्थचि सारे । धन्य मानवदयाळु असारे ॥ ७॥ हे परार्थकविळास कळांचे । देह भूरुह वरां सकळांचे ॥ घे करें वदनहें फळपानें । सेविती पशु तृणें जळपानें ॥ ८॥

भुजंगप्रयात:— सभाग्यात रूच्या फुलां पल्लवांनें । स्वयें घेव दे येरितीं बल्लवांनें ॥ कृपायुक्त नम्रां वरी हात टाकी । बसे त्यांतळीं भानुकन्या तटाकीं ॥ ९॥ असा दूरि टाकूनि रुंदावनातें । हरी येउनी धेनुवृंदावनातें ॥ बसे देखुनि पुष्पिंता काननातें । गडी सेविती श्रीमृगांकाननातें ॥ १०॥

वसंततिलका:— तेथें क्षुधें करूनि त्या पशुपाळकानीं । हे घातलीं विनवणी व्रजपाळकानीं ॥ कीं प्राण आजि अजि भूक बळें हरीते । देऊनि अन्न बहु तृप्ति करीं हरी ते ॥ ११॥

उपजाति:— ह्मणे हरी येथुनि यज्ञशाळा । समीप जहें दिसते विशाळा ॥ स्वर्गानिमित्तें यजनें करीती । तेथें असे अन्न अनेक रीती ॥ १२॥ ह्मणाल आह्मी पशुपाळ जाती । तेथें प्रशस्त महाद्विजाती ॥ मागों कसें अन्न तयां द्विजांनें । यावें परीत्यें निजपुण्य जातें ॥ १३ तरी स्वयें जा न तुह्मी न सारे । मागा मदाज्ञेंच करूनि सारे ॥ कींना ममाग्रें मम अग्रजाचें । सांगा तुह्मीं सैन्य समग्र ज्याचें ॥ १४॥ निरोप ऐसा पशुपां सजाल । ते मागती अन्न तयां द्विजांला ॥ ते थूनि कीं सन्निध कृष्ण राम । आले स्वयें विश्वमनोभिराम ॥ १५॥

इंद्रवज्रा:— हे थोर कोणही हि नयासमान । द्यावाच याच्या वचनास मान ॥ द्या अन्न ऐसें जरि सार वाटे । आह्मास लावा अथवा सुवाटे

उपजाति— हें आइकीलें वसुधामरानीं । नमान्य केलें नन्हिं पामरानीं ॥ नेदूं असेंही परिनें द्विजाती । नबोलनांगोप निराशजाती ॥ १७
वृत्तांत ऐसा पशुपाळकांनीं । निवेदितां घेव्रजपाळकानीं ॥ लक्ष्मी निमाया करिमंदहास । केलाजिणेंमोहमहामहास ॥ १८ ॥

वसंततिलका— बोलेपुन्हा हरितयांमति लोकरीती । कीं यज्ञएक नव्हतां दुसरा करीति ॥ मार्था अशाच तुह्मिजाउनि विप्रदारा । त्या अन्नदेतिल तुह्यासमहाउदारा ॥ १९ ॥ अत्यंतमीप्रियजयांस जगन्निवास । ज्यांच्यामती समज माजि सदानिवास ॥ माझ्या कथा बहुरुचीपरिसोनिकानीं । ध्यानींनिहीं बसविलें मज बायकानीं ॥ २० ॥ स्नेहस्वभावसहजस्वनएवसाचा । तन्नापिवा समजमाजिचमानसाचा ॥ तोमीं असें जवळि हेपरिसोनिवाणी । देतील अन्न बहु त्यान करूनि वाणी ॥ २१ ॥

उपजाति— ऐकोनि हें शब्द अगाधवाचे । गडीपुन्हा धांवतिमाधवाचे ॥ तेयज्ञशाळेंच मधें द्विजानी । तोंपत्नि शाळेप्रतिगोपजानि ॥ २२ ॥ विप्रस्त्रियासारुनि पाकसारा । ध्यातीमुकुंदा जगदेक — सारा ॥ अलंकृता मौक्तिकमाणिकानीं । मनींसुखींमाधव आणिकानीं ॥ २३ ॥ देखोनियांते हरिदासत्यानें । नमोह्मणोनी नमिती सत्यांतें ॥ सन्मान देऊनि अनेकरीती । आलाहरीहें श्रुत तेकरीती ॥ २४ ॥

शिखरिणी— द्विजांच्यापत्न्याहोवचनवदतां हें मनिं धरा । तुह्मींप्रेमेंचित्तीं स्मरत असनां ज्यागिरिधरा ॥ स्वयें आला आहे बहु जवळितां येथुनिहरी । तया द्या अन्नें जो स्वजन जठराग्नी परिहरी ॥ २५ ॥

स्वागता— ऐकतां निकट आगमनातें । नावरेच अनुरागमनातें ॥ अन्नषड्रस चतुर्विधजाती । घेउनी हरिस सन्निधजाती ॥ २६

शिखरि०— समुद्रातेंउंचस्थळिहुनि मिळांजातिसरिता । सुखाब्धीतेंजातांत्वरितचितशा प्रेमभरिता ॥ पितापुत्रभ्राताजिसतिस — निवारीनिजपती । नन्ही गेल्या जेथेंपशुपजनयुक्त व्रजपती २७

नटीं कालिंदीच्या स्फललित अशोकद्रुमवनीं ॥ स्वगोपाळांमध्यें कृ-
ष्णपदरजें धन्य अवनी ॥ गडीगातीकीर्तिस्त्रिगतिवडिलाबंधुसबळा
॥ पहातीतोदृष्टी करुनि अबलाभाग्यसबळा ॥२८॥

द्रुतविलंबित:- वन अशोक तरूनवपल्लवीं ॥ रुचिर त्यांनसहाग्रजब-
ल्लवीं ॥ हरिदिसे श्रमक्षयेरितिबोलतो ॥ परिमनींपरमार्थसखोलतो २९

शिखरिणी:- अशोकाधीरांच्यातनुवरिस्फशोभापदलवीं ॥ नखींश्री-
कृष्णाच्या अभिनवनवीजेमनिलवीं ॥ हरीनेथेंक्रीडेह्मणुनिरसऐ-
सास्रवतसे ॥ अशोकांनेजेथेंकथिश्रमनवेपल्लवनसे ॥ ३० ॥ पदां
दोंची व्याख्या प्रकटचि दिसेपल्लवपदीं ॥ नयामध्येंवर्णेप्रथमपद नं-
दात्मजपदीं ॥ नखेंत्याचीं त्याचेलवमुनिअसेंसूचवितसे ॥ भलेघे-
तीयेथेंलवपदरसाचीचवितसे ॥ ३१ ॥ हरीनेथेंक्रीडे करुनि नटवे-
षासमिरवे ॥ घनश्यामादेहींमणिमय अलंकार बरवे ॥ गळांमाळा
कर्णावरिच अलकांउत्पल कळ्या ॥ पहातांत्यारूपाउठतिमनिसं-
तोषउकळ्या ॥ ३२ ॥

मालिनी:- सजलजलदगात्रें त्यांनरत्नेंसुवर्णें ॥ झळकति वसनेंही बी-
जजाणोंसुवर्णें ॥ मृदुतनुवरिनानापीत आरक्त चित्रें ॥ पशपक-
रितिनेशीं रेखिलीं जेविं चित्रें ॥ ३३ ॥

स्वागता:- अंडकोटिहि धरूनि नटांचा ॥ त्यांचियातनुसवेषनटांचा ॥
श्रीकरें फिरविनो कमळातें ॥ नाशितो स्वजनशोकमळातें ॥ ३४ ॥

पृथ्वी:- अशोक तरूच्यातळीं फिरविवर्तुळश्रीहरी ॥ सरोजकरिंशून्य
तेंस्वजनशोकजाणोंहरी ॥ असेविविध भावजेश्रमकथारसींसू-
चवी ॥ वदेलकितिकोणतेपरि अशा नयांच्याचवी ॥ ३५ ॥ पळांत
अतिउत्तमेंस्रवति आपल्या जेंपळें ॥ ह्मणूनिहरिसूचवीश्रवणदा-
वितांउत्पळें ॥ उदारपण ज्यांपळांह्मणतिउत्पलें तेकवी ॥ मनीं ह-
रिचवामनीं परम अर्थ हासूचवी ॥ ३६ ॥

वसंततिलका:- ऐकोनिजो स्वहृदयांतचिरेखिलाहो ॥ प्रत्यक्षतोचि
नयनींहरिदेखिलाहो ॥ आलिंगिला निजमनें प्रभुत्यासत्यांहीं ॥
केलें नयाउपरिवंदन त्यासत्यांहीं ॥ ३७ ॥

मालिनी:- क्रतिसहिवदवेनाजोऽत्दषीकेशवाचें ॥ पुसिनिकुरळकेशीं पायल्याकेशवाचे ॥ पदकमळयुगींत्याश्यामळाभृंगमाळा ॥ मि-रवतिसुरवतेव्हांस्थावराजंगमाला ॥ ३८ ॥

उपेंद्रवज्रा:- हरीह्मणेकीं तुह्मिविप्रदारा ॥ महांसभाग्यापरमाउदा-रा ॥ पह्मावयापानलियानमातें ॥ अलभ्यजोमीत्रिदशोत्तमातें ॥ ३९

उपजाति:- जडाअनर्थांतसमानसाचा ॥ जोअर्थतोमीप्रियमानसा-चा ॥ सर्वांसहीगोडचिवाटलोंकीं ॥ प्रीतीसहेएकचिवाटलोकीं ॥ ४०

वसंततिल०:- आत्माचतोपरममीह्मणऊनिमातें ॥ जाणोनिसंतभज-तीपुरुषोत्तमातें ॥ जेहेतुवर्जितमनाव्यवधानसाची ॥ तेस्वात्म-भक्तिमजअर्पितमानसाची ॥ ४१ ॥

द्रुतविलं०:- सकळआत्मनिमित्तचिआवडी ॥ जननदर्थसमस्तहि सावडी ॥ किमपिहेतुनसोनिहितोप्रिय ॥ क्षणभरीपरिहोयन-अप्रिय ॥ ४२ ॥

शिखरिणी:- स्वयेंस्वात्मातोह्माहरिह्मणउनीपावनकळे ॥ नघेतां-भक्तीचापरमनिजसद्भावनकळे ॥ स्वभुक्तीमुक्तीचेंविरजणनि-मित्तप्रियपणा ॥ विलंबेंसिद्धीच्याउडविरुचितेभक्तिरूपणा ॥ ४३

वसंततिं०:- स्वात्माचकृष्णह्मणुनीप्रियज्यांसवाटे ॥ हेदोनिकंटक-तयासनत्यासुवाटे ॥ भक्तीसहेतुअरुचीसनिमित्तकांहीं ॥ कां आदळेलसकळात्मउपासकांही ॥ ४४ ॥

पृथ्वी:- ह्मणूनिह्मणतोहरीकुशळअर्थदर्शीअसे ॥ स्वबोधतनु-तेंमलाह्मणतिहानिजात्माअसे ॥ स्वभक्तिचअहेतुकीकरिति हेतुजेथेंसरे ॥ नअप्रियकधींअसेंव्यवहितलहीवोसरे ॥ ४५ ॥

उपजाति:- अशाप्रियातेंपुरुषोत्तमातें ॥ पह्मावयापानलियानमातें ॥ हेंयुक्तकींमीप्रियमानसाचा ॥ सर्वांप्रियांमाजिसमानसाचा ॥ ४६

मालिनी:- ततुमनविषयांचासर्वजोजोपसारा ॥ अनृतचिपरिमाझ्या त्यामध्येंव्यापसारा ॥ लहरिहितृषितानेंगोडतेजीवनानें ॥ प्रि-यसकळहिकेलेंम्याजगज्जीवनानें ॥ ४७ ॥

शिखरिणी:- प्रियेंसारींज्याणेंप्रियपरमतोहोशुभंजना ॥ असा-

मीत्या माझ्या तुह्मिं गवसिलें प्रेम भजना ॥ असें जें हें केलें बहु उ-
चितवाटे मज परी ॥ पतीजेथें तेथें गमन करणें एतदुपरी ॥ ४८ ॥
तुह्मीं जावें जेथें स्वपति करिती देवयजन ॥ प्रियांच्यायोगें ते करि-
तिल समासी द्विजजन ॥ सखयाच्या यागोष्टी वदत सखदेष्मी हरिप-
री ॥ बहु क्लेशी जाल्या गमन बदला जें तदुपरी ॥ ४९ ॥ बहु क्लेशी जा-
ल्या श्रवणिं पडतां हें द्विजसत्या ॥ जळातें नेत्रांच्या पुसुनि वदती
श्रीपतिसत्या ॥ अहाहा देवा तूं परम करुणासागर हरी ॥ नया ही
मध्यें हे नवल उठली क्रोधलहरी ॥ ५० ॥
वसंततिलका — हे शब्द योग्य न तुतें पुरुषोत्तमातें ॥ मिथ्या न को क-
रु तुझ्या निगमागमातें ॥ वायां न जाय निजभक्त असी स्ववाणी ॥
साची करूनि न करीं करुणेस वाणी ॥ ५१ ॥
शिखरिणी — पदांपासीं आलों चरणनिजनिर्माल्यतुळसी ॥ धराया
माथां जेद कलिसि पदें तें अतुळसी ॥ पती पुत्र भ्राते सुहृदजन लं-
घूनि सकळा ॥ निघालों त्या आह्मी गति न तुजवांचूनि विकळा ॥ ५२ ॥
वसंततिलका — अंगीकरील न पती न पिता न बंधू ॥ आह्मासि तूंच ग-
नि यावरि दीनबंधू ॥ ज्याच्या पदा जवळि लोळणि या प्रकारें ॥ द्या-
वें न अंतर अशा अजि निर्विकारें ॥ ५३ ॥
द्रुतविलंबित — पद जयांस तुझें परमागती ॥ त्यजिसि त्यांस अतः पर
मागती ॥ वदसि यावरि शब्द ह्मणी असा ॥ ह्मण पदांजवळीच तु-
ह्मी असा ॥ ५४ ॥ करूनि हास्य ह्मणे हरि कांपनी ॥ त्यजिति सर्व तु
ह्मास चि कांपती ॥ धुवुनि ते तुमच्या पदपंकजा ॥ पितिल ते अतिपा-
वनपंकजा ॥ ५५ ॥ किमपि दोष तुह्मांस कदापि ते ॥ पति न लाविति
आणि सर्वे पिते ॥ सकळ ते सह बंधु सहोदर ॥ स्मरति हे तुमचे गुण
सादर ॥ ५६ ॥
पृथ्वी — अहो तुमचिया द्विजां स्वकृतपुण्य सांठा किती ॥ तुह्मांस सुर
वंदिती नभिं हुनी फुलें टाकिती ॥ ह्मणूनि तुह्मि जा गृहा त्यजुनि शी-
घ्र या आग्रह्य ॥ ह्मणे हरि करा मनीं स्वपदभक्तिच्या संग्रहा ॥ ५७ ॥
भुजंगप्रयात — घडे भक्ति जैशी मनाच्या प्रसंगें ॥ न साधे न सी माझि-

या अंगसंगें ॥ मनीं ध्यामला सर्व पावाल मातें ॥ स्मरा अंतरीं सर्व सर्वोत्तमातें ॥ ५८ ॥

द्रुतविलंबित.— शुक ह्मणे हरिची असि वैखरी ॥ द्विजसत्या मनिं मानुनि या खरी ॥ परतल्या अवघ्याच मखालया ॥ अशन अर्पुनि तें सुखालया ॥ ५९ ॥ द्विजन लेश हि वाइट मानिती ॥ परम सादर त्यां सच वानिती ॥ दिधलि सद्यजिला परमागती ॥ स्मरति तीस हि मागति मागती ॥ ६० ॥

वसंतति०.— जातां हरीजवळि एक सती पतीनें ॥ जेसां पडे हरि मनींच समीप नीतें ॥ ध्यानीं दिसे तनु सुटे सह लिंगदेहा ॥ सारूप्यमोक्ष निज तीस मुकुंद दे हा ॥ ६१ ॥ देखोनि कृष्णपद भक्ति वियाप्रताप ॥ त्यान्याय आठविति पावति विप्रतापा ॥ धन्यत्व वर्णिति तया अबलाजनाचें ॥ सान्निध्य ज्यास घडलें भवभंजनाचें ॥ ६२ ॥

द्रुतविलंबित.— शुक ह्मणे द्विज ते अनुतापले ॥ स्मरति जे अपराध हि आपले ॥ स्तविति आपुलिया अबलाजना ॥ जिहिं सदन्न दिलें भवभंजना ॥ ६३ ॥

वसंतति०.— श्रीकांतभक्ति अवलोकुनि त्या सत्यांची ॥ ते वासली परम संमति त्यां सत्यांची ॥ यालागिं वानिति अशा अबलापणानें ॥ धिःकारिती निज गुणां सह आपणानें ॥ ६४ ॥ विश्वंभर त्रिभुवनेश्वर विश्वपाळी ॥ तो मागतो ह्मणुनियां स्फुट धेनुपाळीं ॥ सांगीतलें न न्हि तयां दिधलें न कांहीं ॥ तें अन्न नेउनि दिल्हें निज बायकांहीं ॥ ६५ ॥

इंद्रवज्रा.— आह्मीं गुरू सर्व जगा हि जाती ॥ दाऊं जना मार्ग तसें चि जाती ॥ ऐशा सही जे करिते भ्रमाया ॥ ते या हरीचीच रखेन माया ॥ ६६ ॥

वसंततिलका.— माया असी ह्मणुनि जे वदतो जनानें ॥ ते हीन सो समजलो भवभंजनानें ॥ मायायती सहि करी भ्रम विष्णुमाया ॥ जीवत्व जी करूनि तोचि धरी रमाया ॥ ६७ ॥

शिखरिणी.— पहा होनारींचें हरिचरणपद्मप्रियपण ॥ द्विजां आह्मां नाहीं पद तप शुक जे मूढरूपण ॥ अहो ज्या मज्ञानें जननमरणाचाउपरम ॥ स्त्रियां त्या ठाई तो द्विज ह्मणति आश्चर्य परम ॥ ६८ ॥

वसंततिलका — संस्कारजो द्विजपणीं अबळांस नाहीं ॥ ज्यालानसे गुरुगृहीं सदुपासनाहीं ॥ ऐशास भक्ति अशिअंबुजपाणिजीची ॥ आह्मा अशां द्विजवरां सहि वाणिजीची ॥ ६९ ॥ ज्या अंगना कधिन आचरल्यातपातें ॥ सोसूनि वर्ष हिम आणिक आतपातें ॥ ऐशांस भक्ति निज अद्वयलाभवार्ता ॥ जो मुक्तिमार्गपददारखविनो भवार्ता ७०

शिखरिणी — अहो आह्मी शास्त्रें पटतपद त्यानें विसरलों ॥ पथें दिव्याजानां पतितगृहकूपीं घसरलों ॥ ह्मणूनी अन्नाचें मिसकरुनि आह्मासहि हरी ॥ मुखें गोपाळांच्या स्मरणनिज देविस्मृनि हरी ७१

स्वागता — अन्यथा त्रिभुवनेश्वर साचा ॥ काय तो क्षुधित अन्नरसाचा ॥ मानवीतनु धरूनि हरी तो ॥ सत्कथा करुनि बंध हरी तो ॥ ७२ ॥

शिखरिणी — अनंतें ब्रह्मांडें धरुनि हि अनंतत्व न सरे ॥ स्वयें तो हे यज्ञक्षितिहि मरवजी माजि पसरे ॥ यदूच्या वंशीं तो तनु धरुनि आहे व्रजजनीं ॥ कळोनी ही ऐसें मतिन भरली कृष्णभजनीं ॥ ७३ ॥ जया काळीं काळ त्रिगुणमय होऊनि वसतो ॥ ऋतु यज्ञानें जो निगमविधिवेत्यांग वसतो ॥ यदूच्या वंशीं तो तनु धरुनि आहे व्रजजनीं ॥ कळोनी ही ऐसें मतिन भरली कृष्णभजनीं ॥ ७४ ॥ पृथिव्यादि द्रव्यें सकळ मखहव्यें मखपती ॥ स्वयें जाला ज्यांत त्रिभुवनमयें सर्वखपती ॥ यदूच्या वंशीं तो तनु धरुनि आहे व्रजजनीं ॥ कळोनी ही ऐसें मतिन भरली कृष्णभजनीं ॥ ७५ ॥ स्वयें जो हा मंत्र ऋतु सकळतंत्र ऋतुपती ॥ रमा ज्याची पत्नी भुजगपतिपर्यंकसुपती ॥ यदूच्या वंशीं तो तनु धरुनि आहे व्रजजनीं ॥ कळोनी ही ऐसें मतिन भरली कृष्णभजनीं ॥ ७६ ॥ स्वकांतासत्संगें करुनि अनुनसा द्विजपरी ॥ न गेले दुःसंगें हरिपदपहायातदुपरी ॥ स्वदेशाचा कंसक्षितिपतिनयाचें भय मनीं ॥ अभाग्यानीं केलें ह्मणउनि न आलस्य गमनीं ॥ ७७ ॥

भुजंगप्रयात — सभाग्या स्त्रिया निर्भयात्या पदातें ॥ पहातां पहा पावल्या संपदातें ॥ करीनां जन्हीं शोक ऐसे द्विजाती ॥ नन्हीं कंसधाकें न भेटीस जाती ॥ ७८ ॥

वसंततिलका — धर्मार्थकाम पुरुषार्थ असे प्रसिद्ध ॥ पावोनि हे पुरुष माथुर विप्र सिद्ध ॥ भक्ती विणें हरिचिया गुण ते उडाले ॥ त्या त्यास्त्रिया तरलिया नर ते बुडाले ॥ ७९ ॥

द्रुतविलंबित — पुरुष ते अबळा अति उत्तमा ॥ जरि अनन्य भजे पुरुषोत्तमा ॥ नर न ह्नें नररूप जन्हीं खरा ॥ प्रिय मुकुंद न से व्यजयां खरा ॥ ८० ॥ पुरुष तो भजनां अबळा जना ॥ शरण वामन त्या भवभंजना ॥ ह्मणत से हरिला पुरुष खरें ॥ मनिं धरील तया पुरुष खरें ॥ ८१

ऋषिपत्न्याख्यान समाप्त

---

## जटायुस्तुति.

### प्रारंभः

मालिनी — रघुपति न नुवाटे स्पष्ट चिद्रूप तीनें ॥ स्मरत कथिन भाषेया जटायुस्तुतीतें ॥ स्तवित जशि त्व गुंपी श्लोकधाटी द्विजाती ॥ तसि त्वरचि लटीका वामनाख्य द्विजाती ॥ १ ॥

पुष्पिता० प्रथम ह्मणत से जटायु वाचें ॥ अगणित सद्गुण सद्गुणार्णवाचे ॥ क्षितिरज हि जन्हीं धरूनि मोजी ॥ परि न गणी गुण त्या करूं न मोजी ॥ २ ॥ प्रकट गुण करी जगीं रमाया ॥ नमन तया तुज नित्य अप्रमेया ॥ प्रथम उपजतां अनादि माया ॥ ह्मण विसि आद्य न लिंपसी भ्रमाया ॥ ३ ॥ जग उगळि गिळी करी स्थिती नें ॥ निरखि यथा स्थित आत्मता स्थिती नें ॥ रमति मुनि मनें स्वचित्स्वरूपीं ॥ परम तयां स विराम रामरूपीं ॥ ४ ॥ पर परम परेश जीव भूतें ॥ सकळ हि जो तुज त्यां नमूं विभूतें ॥ हर गरन निवे धरूनि चंद्रा ॥ ह्मणुनि जपे तुज नित्य रामचंद्रा ॥ ५ ॥ अवधि रहित जो कळस्वरूपी ॥ नयनिं सरूप दिसे तन्हीं अरूपी ॥ निज परम उपाधि सार माया ॥ करि विभक्त दृष्टि कसी निलार माया ॥ ६ ॥ धरूनि तनु समस्त ही उपांगें ॥ त्वद् धिं वसे प्रकृत्या कृपा अपांगें ॥ निज अगुणपणीं असी स्वमाया ॥ ह्मणवुनि सूत्र विराम आगमा

या ॥ ७ ॥ दशमुख अतिदुःखदे सुरेंद्रा ॥ ह्मणउनि हो अवतार या नरेंद्रा ॥ भवभयनुरवी अनादि कांहीं ॥ निजसुखदे चतुरा न नादि कांही ॥ ८ ॥ नरवरशरचापहस्तराम ॥ त्रिभुवनसुंदर जो मनोभिराम ॥ वरदपरम जो वरप्रदानें ॥ नमिन मि त्या तुझिया चजीपदानें ॥ ९ ॥ त्रिभुवनरमणीयरूप साचें ॥ मन निववी अनुतप्रतापसांचें ॥ तनु जसि यमुनासु नीलपाणी ॥ पुरवि अभीष्ट यथेष्ट चापपाणी ॥ १० ॥ सुरतरुतळिं राम बैसला हे ॥ अभय असें स्मरणा रसद्य लाहे ॥ चरणशरण येति त्यांस पाहे ॥ नमिन जया रघुनंदनीं रूपा हे ॥ ११ ॥ भववनवणवा च नाम साचें ॥ तुरविललेश हि शेष नाम साचें ॥ विगतरज जपोनि नामधेया ॥ स्मरत असों पद हें मनामधेंया ॥ १२ ॥ रतस न न करूनि रामनामीं ॥ विशद तया समजाविलों मनामी ॥ वरदपरम जे त्रिलोचनादी ॥ रघुवर देव न त्यांस ही अनादी ॥ १३ ॥ शरणजनदयाळु देवदेवा ॥ स्मरनि जयास शिवादि सर्वदेवा ॥ दनुजपति असंख्य संहरीतो ॥ परमदयाळु तथापि जो हरी तो ॥ १४ ॥ वधि असुर असंख्य चापपाणी ॥ तनु यमुनें निलजे विंनीळ पाणीं ॥ जशि च बहिण सांवळी यमाची ॥ दनुजवधी तनु ने रघूत्तमाची ॥ १५ ॥ असुरहर दयाळु सर्व देवां ॥ रघुपति देव न जें महासदेवां ॥ अशुभ सकळ शीघ्र संहरीनें ॥ रघुपतिनाम भजों तयाहरीनें ॥ १६ ॥ जडमति भवभावनाविरेना ॥ रघुपतिनों बहु दूरि हो स्फुरेना ॥ परिहरिति मुनींद्र जे अहंता ॥ जवळि तयांसि दशाननादिहंता ॥ १७ ॥ भवजलधि नरा व या उपाय ॥ त्रिभुवनिं एक चि नाव राम राय ॥ ह्मणवुनि रघुनंदना नयाला ॥ शरण असे स्वपदप्रदान याला ॥ १८ ॥ शिवगिरितनया मनीं निवास ॥ प्रियतर त्यां उभयां जगन्निवास ॥ सुरवरदनुजेंद्र ही पदानें ॥ भजति न यां प्रभु देस्व संपदाने ॥ १९ ॥ गिरिधरि मथितां सुधांबुधीनें ॥ शरण तया तुज मी दयांबुधी नें ॥ सुरवरद सुधा सुरां स पाजी ॥ चरित जगीं सुचरित्र ते लूपाजी ॥ २० ॥ परधन

परदारवास नाहीं ॥ परजनमत्सरही जयास नाहीं ॥ परहितचि जयास्वलाभरामा ॥ तवपदसेव्य तयां मनोभिरामा ॥ २१ ॥ सुखपरगुणवैभवें करूनी ॥ त्यजुनि ममत्व समत्व हें धरूनि ॥ भजति जन असे मनोभिरामा ॥ शरण मित्या तुज अंबुजाक्षरामा ॥ २२ ॥ विकसित मुखपद्म हास्य मंद ॥ स्वसुख मनांतिल सूचवी अमंद ॥ स्मरत भजन इंद्रनीळनीला ॥ क्रमिति भले दिवसास यामिनीला ॥ २३ ॥ स्मरति सकळम त्यांस रामचंद्र ॥ स्वजनसुखार्णवनित्य पूर्णचंद्र ॥ गुरुवर सकळां गुरूंस देवा ॥ रघुपति तूं गति सज्जनांस देवा ॥ २४ ॥ अमळकमळशुभ्र त्यासमान ॥ प्रभु नयन द्वय भेदल्यां समान ॥ कथि निगम रहस्य जो विधीनें ॥ करिनमि तद्भजनाचिया विधीनें ॥ २५ ॥ हरिहरविधिरूप तीन भेद ॥ त्रिगुण उपाधिगुणें स्वयें अभेद ॥ बहु घट जळिं सूर्यबिंब लाहो ॥ ह्मणुनि तुझा स्वमनीस आत्मलाहो ॥ २६ ॥ स्तविति तुजचि अंबुजासनादी ॥ त्रिदशपति स्तुतिपात्र तूं अनादी ॥ सकळसुरवरेश तूंचि देवा ॥ स्तविन असें ह्मणऊनि देवदेवा ॥ २७ ॥ त्रिभुवनिं हि समान वस्तु नीतें ॥ त्यजुनि करी सुरमानव स्तुतीतें ॥ अनृत गुण अपक्व कुंभ पाणी ॥ अमरपति स्तुति पात्र चापपाणी ॥ २८ ॥ रघुपति तनु सुंदरत्व कोटी ॥ रतिपति पावति काय कोटि कोटी ॥ करुनि घडि घडी अनंग खोटी ॥ घडिल विधी तहिं साम्य गोष्टि खोटी ॥ २९ ॥ शतच शत सुमार्ग ज्यांत नाना ॥ निगम असे करिती जगीं न नाना ॥ रघुपति बहु दूरि बोध रीती ॥ श्रुति अति बाधक नाजऱ्हीं धरीती ॥ ३० ॥ ह्मणउनि निगमोक्त भावनाही ॥ विफळ जरी रघुराज भाव नाहीं ॥ यतिपति हृदयारविंदवास ॥ प्रभु सपडे जन्हिं नो जगन्निवास ॥ ३१ ॥ रघुपतिविण अन्य कामना हीं ॥ यतिपण येरि नितें फुका मनां हीं ॥ करुनि परिहरी तनु श्रमानें ॥ धरुनि हि काय चतुर्थ आश्रमानें ॥ ३२ ॥ वसति हि रघुराजभक्तगेहीं ॥ रघुपतिभक्ति निरूपिती उगें हीं ॥ नन्हि हित उपदेश गुह्य वाटे ॥ यतिपति चाल-

ति जाति त्याचि वाटे ॥ ३३ ॥ यतिपण बहुतांस देति वाचे ॥ यतिपति ते निजभक्त राघवाचे ॥ पति यतिस दिसे जगन्निवास ॥ तरि म्हण वे यतिनाथ हृन्निवास ॥ ३४ ॥ अधनपति धनाढ्य जेवि राजे ॥ यतिपति वित्त असें जनीं विराजे ॥ कनकरघुपती अकिंचनाचें ॥ जग नगरूप तयाच कांचनाचें ॥ ३५ ॥ रघुपति भवभावना हरीतो ॥ हरि जड दुःख म्हणूनि कीं हरीतो ॥ पदवि परम दे स्वसत्तमातें ॥ शरण जटायु तया रघूत्तमातें ॥ ३६ ॥

उपजातिः– ऐशा स्तवें राघव तुष्टला हो ॥ दे त्या जटायूस यथेष्ट लाहो ॥ प्रसन्न त्याला रघुराज जाला ॥ देतो स्वयें हे वर अंडजाला ॥ ३७ ॥

भुजंगप्रयातः– म्हणे राम कीं जाय माझ्या पदातें ॥ सुखें भोगि मुक्तीचिया संपदातें ॥ तुझें स्तोत्र हें सर्व लोकांस तारू ॥ असें बोलतो जो भवांभोधि तारू ॥ ३८ ॥

उपजातिः– बोले जटायूप्रति जो स्ववाचा ॥ तो शब्द ऐसा प्रभुराघवाचा ॥ तराल ज्याणें तुह्मि लोक सारे ॥ थारे न तो बोल मनीं कुसारे ॥ ३९ ॥ अगा खगा वर्णिल या स्तुतीतें ॥ पावेल तो जे परवस्तु तीतें ॥ लाधेल माझ्या निज आकृतीतें ॥ सारूप्य रे निश्चित त्या कृतीतें ॥ ४० ॥

द्रुतविलंबितः– लिहुनि सादर घे अथवा स्तव ॥ द्विजवरा पद त्यास दिवास्तव ॥ पठनही करि या सुख हेतुतें ॥ गति तयासहि हो जसि हे तुतें ॥ ४१ ॥

वियोगिनीः– असि राघववक्त्र वैखरी ॥ अति हर्षे खग आयिके खरी ॥ रघुनंदन साम्यसंपदा ॥ धरि पावे श्रुतिपूजिता पदा ॥ ४२ ॥

स्वागताः– राघवें स्तुतिस या वरदानें ॥ श्रेष्ठता बहु दिली वरदानें ॥ अर्थ तोचि कथि वामनवाचा ॥ लावुनी रसिक हो मन वाचा ॥ ४३ ॥

उपजातिः– टीकेंत अर्थानुभवस्तुतीचा ॥ अर्थांत बोध प्रियवस्तुतीचा ॥ रामींच हे शेष पलंगसेजे ॥ समर्पिली गाति विहंगसे जे ॥ ४४ ॥ ॥ इतिश्री ब्रह्मांडपुराणे अवनिकांडे जटायुस्तुतिः समाप्ता ॥ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥

# भरतभाव प्रारंभ.

द्रुतविलंबित:– करुनि वंदन जानकिनायका ॥ भरतभाव निरोपिन आयका ॥ जननि टाकुन रामपदीं निघे ॥ सुकृत तो मति हे समजोनि घे ॥ १ ॥

मालिनी:– भरत जवळि नाहीं मातुल-ग्राम-वासी ॥ भरत-जननि धाडी कानना राघवासी ॥ दशरथ मृत झाला राम जातां वियोगें ॥ तृणबहुत दिसांचें अग्निच्या जेवि योगें ॥ २ ॥ मग भरत वसिष्ठें आणिला जो अयोध्ये ॥ नगरि गतधवा ते आणि निर्वीर्य योद्धे ॥ जन मृतसम देखे हेतु कांहीं कळेना ॥ जननि-कृत-कुचेष्टा बुद्धितें आकळेना ॥ ३ ॥

उपजाति:– वृत्तांत सांगे भरतासि माय ॥ स्वानंद जीचा त्रिजगीं नमाय ॥ भेदूनि वक्षस्थळ शब्द तीचा ॥ करी महाक्षोभ महामतीचा ॥ ४ ॥ जाळील तीतें निज-दृष्टि-पातें ॥ पाहे असा हालविनाच पातें ॥ म्हणे अहो पापिणि पापरूपे ॥ जळो तुझें तोंड जडस्वरूपे ॥ ५ ॥ जाळीन हें तोंडचि जाण आधीं ॥ सुखें जया देसि अनंत आधी ॥ न माय तूं वैरिण होसि साची ॥ माझे मनीं भाव खरा असाची ॥ ६ ॥ केला तुवां देखत भर्तृ-घात ॥ क्षणें तिघांटा रचिल्या तिघांत ॥ शत्रुघ्न मी लक्ष्मण राम जोडे ॥ राजा निजा तीस अनर्थ जोडे ॥ ७ ॥

द्रुतविलंबित.– गिरिवनाप्रति रामरमापती ॥ दवडिल्यावर मृत्यु-मुखीं पती ॥ निजविला मज हे विधवा धरा ॥ म्हणसि भोग अयोग्य वसुंधरा ॥ ८

भुजंगप्रया०:– वना धाडिलें जेधवां रामराया ॥ तुवां हेतु केला स्वभर्ता मराया ॥ अहा रामसीता अशा दंपतीतें ॥ वना धाडिलें मारिलें कांपतीतें ॥ ९ ॥

मालिनी.– नकळत पतिताचें खादलें अन्न ओकी ॥ नर पतित नव्हे

---

१ विधवा. २ तीन वाटा. ३ युग्में.

तो पापरूपे अहो कीं ॥ म्हणुनि उदरिं तूझ्या देह हा जन्मला गे ॥ त्यजिन तरि मला हें पाप तूझें न लागे ॥ १० ॥

**वसंततिः०-** हे अग्नि-तापित घृतांत तनू तळेना ॥ प्रत्यक्ष तो कधिं हि पावक आतळेना ॥ रामापराधिनि सुतास शिवेल कां जी ॥ घे ब्राह्मणोत्तम न अंत्यज-पात्र-कांजी ॥ ११ ॥

**इंद्रवज्राः-** राजर्षियोगें निजधर्मपूतें ॥ जीं कां स्वधर्मे वधिती रिपूतें ॥ शस्त्रें न तीं आतळतील मातें ॥ त्वद्गर्भ-संभूत-नराधमातें १२

**वसंततिः०-** मारील सद्य मज खायिन त्या विखानें ॥ कीं पापियास निज-पातक जेविं खातें ॥ तूं पापिणी त्वरित जासिल रौरवासी ॥ होसी सदा निरय-दारुण-लोक-वासी ॥ १३ ॥

**घनाक्षरीः-** अहो केकई हें काय ॥ केलें तुवां हाय हाय ॥ न म्हणवे तूज माय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १४ ॥ सर्व जगदभिराम ॥ वना धाडिला तो राम ॥ केलें विख्यात कुनाम ॥ कीं हे पति-मारिणी ॥ १५ ॥ तुझ्या वधें न अधर्म ॥ तुज मारावें हा धर्म ॥ परि निंदील हें कर्म ॥ राम पाप-कारिणी ॥ १६ ॥ नाहीं तरी प्राण आज्य ॥ तुझें घालुनियां प्राज्य ॥ जाळुनियां सामराज्य ॥ दाखवितों करणी १७

**शालिनीः-** धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे ॥ कौसल्येच्या ये गृहासानुरागें ॥ त्यानें देखे जेधवां राम-माय ॥ श्रीरामाचा शोक लोकीं न माय ॥ १८ ॥

**रथोद्धताः-** मोकळा करुनि कंठ तेधवां ॥ आठवूनि मनिं जानकी-धवा ॥ ते रडे भरतही तसा रडे ॥ जोंवरी नयन होति कोरडे ॥ १९ ॥

**भुजंगप्र०ः-** म्हणे बांसरा घात झाला असा रे ॥ तुझ्या माउलीचेच हे खेळ सारे ॥ वृथा धाडिला राम माझा वनासी ॥ न देखों शके त्या जगज्जीवनासी ॥ २० ॥ अरे राघवें व्यापिले लोक सारे ॥ तरी नावरे शोक माझा कसा रे ॥ तृषाक्रांत डोळे घनश्याम-रामा ॥ पहायास रे सर्व- लोकाभिरामा ॥ २१ ॥

**स्वागताः-** जानकी जनकराज-कुमारी ॥ पाय कोमळ जिचे सुकुमारी

---

१ पेज. २ तत्काळ.

॥ चालली जसि वना अनवाणी ॥ बोलली कटकटा जन-वाणी ॥ २२ ॥ सूनु सूनहि वनाप्रति जाती ॥ आणि जे जित असेल कुजा ती ॥ मानवी तनु पशूंत गणावी ॥ ते शिळा परि सजीव म्हणावी ॥ २३ ॥

**द्रुतविलं०:**— भरत शोक अनेक तिचे असे ॥ परिसतां मग बोलत तो असे ॥ जननि गोष्टि समस्तहि हे खरी ॥ परिस ये विषयीं मम वैखरी ॥ २४

**उपजातिः**— मी ब्रह्महत्या-शत पाप लाहें ॥ ठावें असे लेश जरीं मला हें ॥ खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें ॥ वधीं जईं गाउक हें मतीतें ॥ २५ ॥

**भुजं०:**— म्हणे राममाता अरे वासरा मी ॥ तुझा जाणतें प्रेम उल्हास रामीं ॥ तुला रामसेवेविणें काम नाहीं ॥ न राज्यादिकांची जया कामना ही ॥ २६ ॥

**स्वागता:**— तों वसिष्ठ वदला भरतातें ॥ राम-पाद-निजलाभ-रतातें ॥ पाळिं यावरि समस्त धरा हे ॥ राजनीति करिं सावध राहें ॥ २७ ॥

**वसंतति०:**— रायें तुतेंचि दिधलें स्वनृपासनारे ॥ संपूर्ण तूं जननिची करिं वासना रे ॥ शब्दार्थ हे न कळती गुरु-लाघवाचे ॥ साचे म्हणूनि पद आठवि राघवाचे ॥ २८ ॥

**घनाक्षरीः**— म्हणे भरत हा राम ॥ आहें आहें मेघश्याम ॥ वसिष्ठ हा गुरु नाम ॥ तोही मज कोपला ॥ २९ ॥ अंतरले तुझे पाय ॥ तया राज्याचे उपाय ॥ सांगे मज हाय हाय ॥ नव्हे गुरु आपला ॥ ३० ॥ अग्नितुल्य वाटे राज्य ॥ मज जाळिल साम राज्य ॥ वरी ऋषी घाली आज्य ॥ त्याणें जीव तापला ॥ ३१ ॥ दावीं सत्वर चरण ॥ किंवा स्वामी दे मरण ॥ तुझ्या नामाचें स्मरण ॥ त्याचा भव संपला ॥ ३२ ॥

**उपजातिः**— स्मरोनि ऐसें रघुनंदनातें ॥ त्या राघवाच्या पदवंदनातें ॥ जावें असा भाव धरूनि साच ॥ बोले वसिष्ठाप्रतिही तसाच ॥ ३३ ॥

**वसंतति०:**— राजाधिराज रघुराजचि एक जाणा ॥ पाहों चला सकळ जाउनि त्या सुजाणा ॥ आह्मी समस्त जन किंकर राघवाचे ॥ जें रामनाम जपतों अजि नित्य वाचे ॥ ३४ ॥

**भुजंगप्र०:**— विना राक्षसी कैकयी काननातें ॥ चला सर्व पाहूं मृगांका*ननातें ॥ प्रयत्नेंचि घेऊनि येऊं गृहातें ॥ न येतां समर्पूं शरीरें स्व-

---

* मृगांक-आनन- चंद्रासारिखें मुख ज्याचें अशा रामातें.

हातें ॥३५॥

इंद्रव०:- येणार ते या अथवा न कांहीं ॥ राहेन मी हें नघडेचि कांहीं ॥ बोलोनियां स्पष्टचि-बोलिला हो ॥ शोकांतही घे प्रभुनाम-लाहो ३६

उपजा०:- हा रामहा राम असेंचि दाचे ॥ चित्तांत पाय प्रभु-राघवाचे ॥ त्यजी कुलाचार्यहि राम-वाटे ॥ कीं तो गुरू त्यास गुरू न वाटे ॥३७॥

इंद्रव०- येणार ते या अथवा न कांहीं ॥ शब्दांत या अर्थ सखोल कांहीं ॥ कींजो गुरू अंतर राम-पायीं ॥ पाडी त्यजावा गुरु तो उपायीं ॥३८॥

उपजाति वृत्त:- श्रीरामहि टाकुनि राज्य मातें ॥ जो घे-म्हणे त्या ऋषिसत्तमाते ॥ गुरुत्व कैचे तरि मी उपेक्षा ॥ करीन त्याची न मला अपेक्षा ॥३९॥ या कारणें या अथवा न कांही ॥ राहेन मी हें न घडेचि कांहीं ॥ ऐसी उपेक्षा वदनीं वदे तो ॥ श्लोकांत या व्यासचि भाव देतो ॥४०॥ नाहीं तरी या अथवा न कांही ॥ गुरूस बोलेल घडेल कांहीं ॥ रामानिमित्तें गुरुही त्यजावा ॥ वाक्यांत भावार्थ असा भजावा ॥४१॥ रामानिमित्तें जननीस टाकी ॥ पाणी नपी राज्य नदी-तटाकीं ॥ लंघूनियांही गुरुसंगतीतें ॥ पावे अहो दे गुरु ज्या गतीतें ॥४२॥

द्रुतविलंबित:- गुरुविणें नघडे परमागती ॥ गति शकादि गुरूसचि मागती ॥ परि गुरू करि अंतर राघवीं ॥ न गुरु तो ठक दांभिक लाघवी ॥४३॥

उपजाति:- तो बाप जो राघव-भक्ति दावी ॥ तसीच जी मायहि ते वदावी ॥ जो राम दावी गुरु तोचि साच ॥ श्रुत्यर्थ-इत्यर्थ असे असाच ॥४४॥ वसिष्ठ घे राज्य म्हणे न साच ॥ परंतु भावार्थ नव्हे तसाच ॥ त्याच्या परीक्षार्थचि बोलिला हो ॥ त्याहूनि आधीं मुनि-चालिला हो ॥४५॥ आज्ञा गुरूची अवघे करीती ॥ सच्छिष्य ते लोक अलोक रीती ॥ परंतु त्याच्या वचनें तयातें ॥ न टाकिती सत्पद दानयातें ॥४६॥

स्वागता:- राम तोचि गुरु भेद असेना ॥ भिन्न भाव तरि राम दिसेना ॥ राम टाकि म्हणणेंचि गुरूचा ॥ त्याग आत्म-सुख-क-

ल्पतरूचा ॥ ४७ ॥

इंद्रवज्रा:— तूं टाकि माझ्या वचनेंचि मातें ॥ शब्दें अशा जो गुरुस[1]-त्तमातें ॥ टाकील शिष्याधम तो गणावा ॥ टाकी न जो उत्तम तो म्हणावा ॥ ४८ ॥

स्वागता.— राम न त्यजि तईंच गुरूतें ॥ न त्यजी स्व-स्वकल्प-तरूतें ॥ जो असें वचनही नमनी तो ॥ श्रीगुरू न मनिंही नमनीं तो ॥ ४९ ॥

वसंततिलका:— लंघूनि शब्दहि असा गुरु तो उपेक्षी ॥ शिष्यासि त्या मग कसा गुरु तो अपेक्षी ॥ जो रामनिष्ठ गुरुनिष्ठचि निर्विकारें ॥ सोडी वसिष्ठ भरतासि तया प्रकारें ॥ ५० ॥

उपजाति.— म्हणे परीक्षार्थचि टाकि मातें ॥ तसा म्हणे टाकि र-घूत्तमातें ॥ उल्लंघितां शब्दचि इष्ट वाटे ॥ म्हणोनि लागे ऋषि वर्य वाटे ॥ ५१ ॥

द्रुतविलंबित.— प्रकरणीं पुढिल्या गुरुराज तो ॥ भरत संगतिनेंच विराजतो ॥ जरि पथीं गुरु होय समागमीं ॥ तरिच राम मिळे निग-मागमीं ॥ ५२ ॥

उपजाति.— वसिष्ठ तो आणि समस्त माया ॥ रामार्थ टाकूनि स-मग्र माया ॥ सेना प्रजा सर्वहि त्याच वेळे ॥ जाती जसे लंघिति सिंधुवेळे ॥ ५३ ॥

वसंततिलका:—पायीं निघे भरत सानुज रामवाटे ॥ रामाविणें इतर इष्ट न काम वाटे ॥ माथां जटामुकुट वल्कल नेसला हो ॥ श्रीराम-वेष वदनीं प्रभु-नाम-लाहो ॥ ५४ ॥

स्वागता.— राम-वल्कल-जटादिक रीती ॥ वेष तो उभयबंधु क-रीती ॥ राम सानुज तसें भरतातें ॥ देखती सकळ रामरतातें ॥ ५५ ॥

वसंततिलका:- तों भेटला गुहकनाम किरात वाटे ॥ श्रीरामभक्त पर-माम तयास वाटे ॥ गंगातटीं रघुपती शयनास दावी ॥ ते भक्ति काय म्हणुनी मुखिं हो वदावी ॥ ५६ ॥

---

१ गुरुश्रेष्ठातें. २ न मानी. ३ मर्यादेस.

स्वागता.— दर्भनिर्मित तया शयनातें ॥ देखतां उदक ये नयनातें ॥ भूतळीं भरत घालुनि घेहो ॥ त्या स्थळींहुनि न चित्त निघे हो ॥ ५७॥ राम-वृत्त रघु-वंश-वरातें ॥ सर्व वर्णुनि गुहाख्य-किरातें ॥ लंघुनी सुरनदी भरतातें ॥ ने ससैन्य रघुराज-रतातें ॥ ५८ ॥

उपजाति.— ब्रह्मा रमा वंदिति नित्य ज्यातें ॥ त्या राघवाच्या च-रणांबुजातें ॥ पाहूं बरे हे भरता असोसी ॥ वियोग तो प्राणवियो-ग सोसी ॥ ५९ ॥

शालिनी.— कैकेयीच्या दुष्टभावें जळाला ॥ इच्छी रामाच्या पदाच्या जळाला ॥ तों स्वामीच्या देखिलें आश्रमातें ॥ कांहीं चित्तें टाकिलें ह्या श्रमातें ॥ ६० ॥

स्वागता.— पाद-चिन्हित-तये वसुधेतें ॥ देखतां तृषित जेविं सुधे तें ॥ रामचंद्र-पदसारस-मुद्रा ॥ वाढवी भरत-सौख्य-समुद्रा ॥ ६१ ॥

वसंततिलका.- घालूनि घे भरत देखुनि त्या रजातें ॥ शत्रुघ्न ही अनु-सरोनि निजाग्रजातें ॥ चित्त स्मरे प्रभुचिया पदनीरजातें प्रेम-प्र-वाह नयनीं सुखनीर जातें ॥ ६२ ॥

द्रुतविलंबि०.- तनुवरी गुढियाच उभारती ॥ कविमुखें किति वर्णिल भारती ॥ भरत येरितिनें अजि लोळला ॥ प्रभुपदाब्ज-रजीं बहु घो-ळला ॥ ६३ ॥

वसंततिलका.- हा राम राम रघुनंदन हेंचि वाचे ॥ चित्तांत ते चरण दी-सति राघवाचे ॥ ते रेणु हे मुकुटमंडण जे शिवाचे ॥ ऐसें म्हणे त्य-जुनि भाव अहो जिवाचे ॥ ६४

मालिनी.— भरत पदरजीं त्या घोळला दीर्घकाळ ॥ त्रिभुवनिंहि सुखाचा होय तेव्हां सुकाळ ॥ न मिळति पद-रेणू जे विरंच्यादिकां-ही ॥ सुलभ मज म्हणे हें भाग्य माझेंचि कांहीं ॥ ६५ ॥

वसंततिलका.- देखोनि राघव-पदाब्ज-रजास वाटे ॥ लोटांगणीं गडबडी सुख फार वाटे ॥ आनंद-नीर हृदयीं नयनांबुजाचें ॥ चित्तांत राम-पद घे रज अंबुज्याचें ॥ ६६ ॥

---

१ भिजलें २ कमळ ३ रजःकण. ४ उदक.

स्वागता. — वाम-अंकगत भूमि-कुमारी ॥ वामबाहु करता सुकुमारी ॥ वल्कलांबर जटा अभिरामा ॥ देखतो भरत त्या रघुरामा ॥ ६७ ॥

इंद्रवज्रा. — दूर्वा-दल-श्यामल दीप्ति देहीं ॥ सेवी पदें लक्ष्मण तो विदेही ॥ गंगातटीं सेवित मंदवातें ॥ देखे अशा श्री रघुपुंगवातें ६८

उपजाति. — देखोनि ऐसें रघुनंदनातें ॥ धावे त्वरेनें पद-वंदनातें ॥ अलभ्य जो हर्ष करादिकांहीं ॥ तो होय त्या माजिच शोक कांहीं ६९

भुजंगप्रयात. — रडे फुंदफुंदे शिरीं पादपद्मा ॥ धरी सद्म मानीतसे नित्य पद्मा[1] ॥ बळें क्षेम दे त्यास वोढूनि राम ॥ स्वभक्त-प्रिय स्वामि विश्वाभिराम ॥ ७० ॥

स्वागता. — मांडिये उपरि बैसविला हो ॥ अश्रुनीर पुसि दे सुख लाहो ॥ बासरा न रड सांग कवार्ता ॥ शब्द हा निबवि दुःख दवार्ता ॥ ७१ ॥

वसंततिलका. — तों देखिला गुरु वसिष्ठ तयास वंदी ॥ ब्रह्मण्यदेव जडला चरणारविंदीं ॥ तों माउल्या तिघिहि सत्वर पावल्या हो ॥ भेटोनियां तिघिहि सत्वर सेविल्या हो ॥ ७२ ॥

उपेंद्रवज्रा. — पिता करवी कीं म्हणतांचि रामा ॥ रडोनि त्या सांगति सूपरामा[2] ॥ रडे अहो रामहि लोकरीती ॥ स्त्रिया पुन्हा शोक महा करीती ॥ ७३ ॥

भुजंगप्रयात. — सपिंडीक्रिया राम गंगेतटाकीं ॥ करी आणि तो पिंड गंगेत टाकी ॥ रडे लोक दृष्टीस शोकश्रमातें ॥ प्रभू दाउनी ये पुन्हा आश्रमातें ॥ ७४ ॥

स्वागता. — तों वदे भरत गोष्टि मनाची ॥ प्रार्थना बहुत आगमनाची ॥ मांडिली परि न राघव मानी ॥ देखतां सुरवरांस विमानीं ७५

द्रुतविलंबित. — म्हणि फिरे स्व-पुरीप्रति रामहा ॥ म्हणुनि आधि मनीं अमरा महा ॥ भरत-शब्द तदर्थ नये मना ॥ पुरवणें प्रभुला सुरकामना ॥ ७६ ॥

---

१ लक्ष्मी २ सु उपरामा-उत्तम मरणा.

**उपजाति:-** आज्ञा पित्याची मजमोडवेना॥ वत्सा तुझी गोष्टिहि तोडवेना॥ घालूं नकोबा मज संकटांत॥ नको पडों या सहसा हटांत॥ ७७॥

**भुजंगप्रयात:-** अरी आयके जेधवां रामवाणी॥ मुखश्री करी बंधुतो दीनवाणी॥ म्हणे तात आज्ञा मृगांकानना रे॥ मला सांग जाईन मी काननारे॥ ७८॥

**शालिनी:-** बापा ऐसें वर्ततां तो विशेषें॥ आज्ञा-भंग प्राप्त दोषां अशेषें॥ एवं राज्यानें तुवां रे भजावें॥ ताताज्ञेनें कानना म्यांच जावें ७९

**भुजंगप्रयात:-** असी आयके जेधवां रामवाचा॥ करी कर्म जें बंध तोडी भवाचा॥ पुढें पांचवा भाव त्या माजि वाचा॥ स्मरा आयका बंध तोडा भवाचा ॥ ८०॥

**वसंततिलका:-** येना असें भरत देखुनि रामराया॥ गंगानदीं रचुनि दर्भ बने मराया॥ पाहे वसिष्ठ-मुनि-वक्त्र- सरोरुहातें॥ श्रीराम आणि खुण दाखवि हो स्वहातें॥ ८१॥ कीं सांग गुह्य अवतार-चरित्र याला॥ जें तारितें चहुं युगांत जगत्रयाला॥ बोले वसिष्ठ मग सन्निध जाउनीयां॥ कां प्राण टाकिसे ह्मणे समजावुनीयां॥ ८२

**उपजाति:-** हा राम मारील दशाननासी॥ या लागिं जातो प्रभु काननासीं॥ नकों निवारूं भरता तयाला॥ ब्रह्मादिकांच्या पद-दा तयाला ॥ ८३॥

**वसंततिलका:-** येणार मागुनि चतुर्दश- वत्सरांतीं॥ राहो वनांत तितुके दिन आणि राती॥ आत्माच तो तुज वियोग तयासि नाहीं॥ येऊनियां करिल जे तव कामनाही॥ ८४॥ हें आयकोनि जरि शोकहि दूर केला॥ प्रत्यक्ष दर्शनसुखास बहू भुकेला॥ तेव्हां उठोनि भरतें पद-वंदनातें॥ केलें दुरूनि ह्मणतो रघुनंदनातें॥ ८५॥ देखोनियां गमन-निग्रह राघवाचा॥ बोले उभा भरत निश्चयरूप वाचा॥ वर्षे चतुर्दश वरीच धरीन देहा॥ त्या नंतरें त्यजिन यास निरोप दे हा॥ ८६॥ वर्षे हि सप्त भरि काळ समाप्त झाला॥ त्या नंतरें अजि तुझ्या चरणांबुजाला॥ स्पर्शो शिरें न जरि देह तयाच वारीं॥ त्यातें त्यजीनचि विरिंचि जरी निवारी॥ ८७॥ वर्षे चतुर्दशाहि रक्षिन शासनातें॥ अंगी करीन

न बसेन नृपासनानें ॥ सिंहासनावरि तुझ्या पद पादुका मी ॥ पूजीन जो तव-पदांबुज- लाभ- कामी ॥८८॥

स्वागता:- पादुका जडित आणुनि हातें ॥ रामचंद्र चरणांबुरु हातें ॥ लावुनी निजशिरीं भरतानें ॥ वंदिल्या रघुवरांघ्रि-रत्नानें ॥ ८९॥

मालिनी:- भरत-जननि जागी होय रामप्रतापें ॥ विकळ रघुपतीच्या द्रोह पापानुतापें ॥ रडत ह्मणतसे मी पापिणी रामराया ॥ न धरिन तनु आज्ञा ये स्थळीं दे मराया ॥ ९०॥ रघुपति तिस बोले टाकि हा शोक माते ॥ इतुकिहि मम माया जींत ही सृष्टि माते ॥ सकळहि सुरकार्या म्याचि हा हेतु केला ॥ अमर दशासुरवाच्या मृत्युनें हो भुकेला ९१

शिखरिणी:- ह्मणी हो कैकेयी बुडविशि तुं शोकांत हृदया ॥ तुझी माझे ठायीं सुमति भरताहूनि सुदया ॥ तुतें मी कौसल्येहुनि अधिक माते समजतों ॥ तुवां ऐसें केलें ह्मणउनि न बारेच मज तों ॥ ९२॥

भुजंगप्रयात:- म्हणे मंथरा रामराज्यार्थ सिद्धी ॥ करी कीं तुझा हो पती हे प्रसिद्धी ॥ तुवां इष्ट मानूनि त्या भारतीतें ॥ दिला टाकुनी कंठिंचा हार तीतें ॥ ९३॥ शारीरीं तुझ्या या परी देवराया ॥ निघोनी करी ये रितीनें भ्रमाया ॥ तुझा यांत अन्याय कांहींच नाहीं ॥ करी मोह माया विरिंच्यादिकांहीं ॥ ९४॥

द्रुतविलंबित:- करुनि मागुति बुद्धिस कोमला ॥ क्षणभरी विसरूंनि नकोमला ॥ तरि असा न पडे भ्रम मागुती ॥ जितचि पावशि हो परमा गती ॥ ९५॥ भरतभाव असा बरवा मनें ॥ सुरस सेवुनि सादर वामनें ॥ अजि समर्पियला पदवंदनीं ॥ रचुनि पद्यपदें रघुनंदनीं ॥ ९६॥ हरिगुणीं ग्रथिल्या यमकां पहा ॥ धरिल घोर भयें यम कांप हा ॥ हरिगुणाविण हो यमकां करी ॥ तरि न दंड धरी यम कां करीं ॥ ९७॥

स्वागता:- राम तुष्ट अशिया यमकां हो ॥ आणखी नियम संयम कां हो ॥ वामनें हरिगुणीं रसनेला ॥ अर्पितां अनुभवीं रस नेला ॥ ९८॥ ॥ श्री

इतिवामनकृतभरतभावंसमाप्त

---

१ सामोरे. २ वाणीतें.

## राधाभुजगप्रारंभः

भुजंगप्रयात- हरीचा वियोगाग्नि संताप राधा॥ न सोसूनियां आठवी स्वापराधा॥ सखी एक दूती प्रिया फार तीची॥ बहू शाहणी मूर्ति जे भारतीची॥ १॥ करी तीस काकूलती सारसाक्षी॥ ह्मणे भेटवी सर्व संसार साक्षी॥ हरीवीण झाल्यें बहू दीन माये॥ त्रिलोकीं सये दुःख माझें न माये॥ २॥ सदानंद जो सर्वदा मोदराशी॥ तया भेटवीं आजि दामोदराशी॥ जयावीण आणी स्वखेदा नवारी॥ त्वरें आणिवो तो सखे दानवारी ॥ ३॥ वियोगाग्नि जाळी मला केशवाचा॥ न बोलों शके तें सये कुंठवाचा॥ न नें सांगवे दुःखजें काम देहा॥ त्वरें आणि वो त्या घनश्यामदेहा॥ ४॥ तनू जाळितां त्रास येना शशीला॥ प्रभाता विना हे सये नाश शीला॥ उरे वीझतां जाळ भाविं गळ्याची॥ फुलांची नशी माळ भावी गळ्यांची॥ ५॥ दिशा जाळितो चंद्रमा आजि दाहा॥ असा निर्मितो या तनूमाजि दाहा॥ नव्हे चंद्र हा कोण कोणी वदेना॥ सुधारश्मि तो ये रितीदाव देना॥ ६॥ नये नीरद श्याम तों मी न जेवीं॥ नदी शुष्क तो माजि तो मीन जेवीं॥ तृषा लागली नाथओष्ठामृताची॥ शरीरास ज्यावीण निष्ठा मृताची॥ ७॥ सये कृष्णउत्कंठित प्राण कंठीं॥ धरूनी बळें काळ निर्वाण कंठीं॥ ह्मणे भर्वशानें तुझ्या प्राण वाहे॥ खरें हें ह्मणोनी तिची आण वाहे॥ ८॥ दुजी कोण नसाद राजीव दावी॥ घ्या अन्यथा गोष्ट कांजी वदावी॥ वदे लोचनीं नीर सक्लेश वाहे॥ अवस्था ह्मणे सांगवो केशवा हे॥ ९॥ अशी राधिका बोलतां दीन वाणी॥ भरे कंठ झाली पराधीन वाणी॥ धरूनी तिला पोटिशीं दूतिका ही॥ रडे आणि सांगे तिला नीति कांहीं॥ १०॥ ह्मणे खोड खोटी तुह्मां मानिनींची॥ पुढें तूं तरी बुद्धि हे मानिनींची॥ हरी दुःख त्या नाग नक्रोग्रराशी॥ नको दाखवूं साजणी क्रोधराशी॥ ११॥ धरी मत्स्य कूर्मादि रूपें दहा हा॥ तयाहीवरी क्रोध केला अहाहा॥ धरी सागरीं पाळिशी मंदराशी॥ हरी तोचि कीं हा निजानंद राशी॥ १२॥ जगन्नाथ जो कृष्ण नानावतारीं॥ स्वयें होउनीयां जना नाव तारी॥ हरी काम कोपादिकां साजणांसी॥ नको कोप त्या तारका साजणासी॥ १३॥ खगेंद्रा अहींद्रा सुरे जेथ दावा॥ त-

या दाविसी क्रोधरूपाग्नि दावा॥ वनामाजि निर्वैर त्या व्याघ्र गाची॥कशी क्रुद्ध त्यांसीच तूं वो अगाई॥१४॥तरी खेद तूं टाकि हो सापराधे॥करो-ना हरी तूजसी कोप राधे॥स्वयें जातसें मीचि आजी वनातें॥त्वरें आ-णितें त्या जगज्जीवनातें॥१५॥म्हणे दूतिका टाकि या काळजीला॥स्व-यें आणितें शीघ्र गोपाळजीला॥वदोनी असें चालिली काननातें॥व-नीं देखिलें त्या मृगांकाननातें॥१६॥शिरीं पाय त्या गोपकांतापतीचे नमूनी वदे शोकसंताप तीचे॥ह्मणे चूक तीची खरी देवराया॥ करूनी पुन्हा पाय हे दे वराया॥१७॥जरी चूकि झाली तरी राधिकेला॥नव्हे योग्य हा जो तुह्मीं आधि केला॥तुह्माला ह्मणूं काय मी लोकपाळा॥ असे बोल आह्मां स्त्रियांच्या कपाळा॥१८॥वियोगें जिणें वर्जिलें अ-न्नपाणी॥मुखातें सदा वाहते खिन्न पाणी॥करीं पूर्ण ताराधनी अर्ध जाला॥ घना दाटि त्याहीवरी मूर्धजाला॥१९॥मुखीं गुंतला सर्वदा ए-क पाणी॥दुजा तर्जनीनें हरी शोक पाणी॥तरी काय सांगों तिच्या मी क-राची॥प्रभाते हरी दीप्ति चामीकराची॥२०॥सुधेतुल्य पाजूनि दंतच्छदा-सी॥कशी आजि केली तशी तुच्छ दासी॥नसे पाड जेथें जगत्स्वामिनी-चा॥तया काय लेखा अशा कामिनीचा॥२१॥तथापि स्त्रिया भाग्ययु-क्तास देवा॥ह्मणोनी भजे नित्य मुक्तास देवा॥मनीं काम या बायकांचे-चपेटे॥तुह्माला न तत्तायकाचे चपेटे॥२२॥जरी प्रीति हे होय देवा नरा-सी॥तया नाचवूं जे शिती वानरासी॥कुयुक्ती वृथा ये स्थळीं कामिनी-च्या॥प्रभा संचल्या जेवि सौदामिनीच्या॥२३॥ह्मणोनीच टाकूनि सर्व उपायां॥सकामा तरी सेविते याचि पायां॥असे बोल बोलोनियां पा-द पद्मा॥धरी मस्तकीं ज्या पदीं नित्य पद्मा॥२४॥असा प्रार्थुनीयां हृषी-केशवाचे॥धरी पाय सप्रेम त्या केशवाचे॥ घरा भक्तिभावें सखा चाल-वीला॥ न अन्या नरा सारिखा चाळवीला॥२५॥करूनी क्षमा सर्व राधा-धराशी॥हराया तिची कामबाधा पराशी॥तिच्या चालिला दूतिका हस्त-हस्तीं॥धरूनी जसा डुल्लतो मत्त हस्ती॥२६॥प्रतीक्षा करी मंदिरीं कंबु-कंठी॥त्रुटी जे युगाहूनिही थोर कंठी॥शकुनें सूचती तों अकस्मात नी-ला॥ह्मणे दूतिका आणिते श्रीपतीला॥२७॥म्हणे लोचनाचें लवो दिव्य

पातें॥ पहायास लोकत्रयाच्या नृपातें॥ बरें आजि भेटेल मांडीस मांडी॥ ह्मणोनी स्फुरद्भाव उल्हास मांडी॥२८॥ ह्मणे कृष्णजी आजि हष्टीं पडावा॥ भुजांमाजि माझ्या हरी सांपडावा॥ हरीचा रतीसंग तोही घडावा॥ अशे सूचितां अर्थ हा ऊघडावा॥२९॥ असा हर्ष मानूनि गोपालदारा॥ उठे जाय तात्काळ बाहेर दारा॥ पहाते बरी दूरि चाळोनि दृष्टी॥ ह्मणे लाभ आहे नवा हा अदृष्टीं॥३०॥ अकस्मात ती मूर्ति गोविंदजीची॥ दिसे पुत्र ता मानिनी नंदजीची॥ पहातां प्रियेनें प्रियाच्या मुखासी॥ त्रिलोकामधें दारि झाली मुखासी॥३१॥ भुजीं कंचुकी फाटताहे तडाडा॥ करीं कंकणें फूटताही कडाडा॥ पुढें होउनी तत्करांभोरुहातें॥ उरोजीं धरी गाढ रंभोरुहातें॥३२॥ घरामाजि नेवोनियां येरितीनें॥ मुकुंदास आलिंगिलें गाढ तीनें॥ वियोगें तुझ्या दीन मी चक्रपाणी॥ म्हणे तों भरे लोचनामाजि पाणी॥३३॥ पुशी चक्रपाणी करें अश्रु तीचें॥ जया वर्णिती वृंद वेदश्रुतीचे॥ करी जो स्वदासाचिया ध्वस्त काळा॥ जळें काजळें तो तिच्या हस्त काळा॥३४॥ शिरीं वंदिती वेद पादांबु ज्याचें॥ पुशी तो तिचें नीर नेत्रांबुजाचें॥ कुचाग्रावरी बिंदु जे कां जळाचे॥ पुशी थेंब काळे निळे काजळाचे॥३५॥ हराया तिचे सर्व ते कष्ट भारी॥ करी मुक्त नीवी तिला केतभारी॥ समारंभ आरंभ ऐसा रतीचा॥ धरी सर्व जानूवरी भार तीचा॥३६॥ स्वयें फेडुनी शीघ्र चोळी सतीच्या॥ कुचातें रतीं शीघ्र चोळी सतीच्या॥ उरोजीं रतीं सर्वदा हस्त नाचे॥ तिचे नीवची सर्व दाह स्तनाचे॥३७॥ कुचाग्रांवरी हार मुक्ताफळांचा॥ रतीं शोभतो श्रीहरीच्या गळांचा॥ शिळा गंडकी मूर्ति पुष्पायुधाची॥ वरी माळ ते शंख धारा दुधाची॥३८॥ रतिस्वेद स्नानाभिषेकासि पाणी॥ करी तेथ निर्माण शंखाब्जपाणी॥ यजी कृष्णमूर्ती अशा चूचुकाच्या॥ रती माजिही भक्तिच्या सूचकाच्या॥३९॥ जया अंबरा स्पर्श भूतांबराचा॥ नसूर्तीसि या स्पर्श दंतांबराचा॥ करीं सूक्ष्म राधा वयें धाकटी जे॥ शिळाभार वाहे उरीं संकटीं जे॥४०॥ जगद्व्यापका मन्मथा काय जी तो॥ स्तनद्वंद्वरूपें हरीही यजी तो॥ जगीं जे स्थळीं द्वंद्व संपुष्ट होतो॥ पहा देव ते ते स्थळीं स्पष्ट होतो॥४१॥ करी गोपिकासंग लीला हरी तो॥ जिणें विश्वपापायलीला

हरी तो ॥ पदें पावती वर्णितां उंच देही ॥ रतीं त्या व्रजस्त्रीस रोमांच दे-
हीं ॥ ४२ ॥ रती कामगेहीं समारंभ भारी ॥ रतीनाथ रोमीं गुढ्या त्या उ-
भारी ॥ स्मरक्रीडनां ये रिती संग झाला ॥ गमेतेंचि अब्दादि या अंग-
जाला ॥ ४३ ॥ नगाचा पदीं घोष एकेचि काळीं ॥ फवाद्यांच कीं त्यारता-
च्या फकाळीं ॥ ध्वनी त्या स्मराच्याच वाजंतराचे ॥ जगा उत्सवीं नादवाद्यां-
तराचे ॥ ४४ ॥ नरस्त्रांत देखोनि पुंभाव रीती ॥ रसज्ञा स्त्रिया भोगकाळीं व-
रीती ॥ ह्मणोनी प्रिया आपणा सांवरूनी ॥ करी या रतीच्या विलासा वरू-
नी ॥ ४५ ॥ जसें वर्णिती कामशास्त्री निबंधीं ॥ यथा पूर्वबंधा न सोडोनि बं-
धी ॥ अकस्मात घाली तळीं श्रीपतीतें ॥ वरूनी करी ऊफराटे रतीतें ॥ ४६
स्थिर ब्रह्म येथें चळे स्वैरमाया ॥ निहीं घेतलीं दोनरूपें रमाया ॥ न हाले
हरी त्या वरी गोपदारा ॥ करी रम्य चांचल्य लीला उदारा ॥ ४७ ॥ उठे ऊफ-
राट्या विलासाचि माजी ॥ असा घोष तो मेखळे माजि माजी ॥ तिच्या-
उत्तमांगीहुनी उत्तमांगीं ॥ फुलें वर्षती त्याचि सर्वोत्तमांगीं ॥ ४८ ॥ उभा-
री हरी छत्र मीनध्वजाचें ॥ हराच्या भयें राज्यविध्वंस ज्याचें ॥ बहू हर्ष-
लें देव देखोनि दृष्टीं ॥ पडे ब्रह्मलोकींहुनी पुष्पवृष्टी ॥ ४९ ॥ स्मराचा रथ
स्वामि गोपाळ राजे ॥ ध्वजीं राधिका मीननेत्री विराजे ॥ पताकांस दृष्टांत
तीच्या कुचा तें ॥ जरीं बांधिले गुच्छ भारी कुचातें ॥ ५० ॥ हरी ऊर्ध्वरेता
द्रवे गोपजाया ॥ रमे जो तिचा शोक संतापजाया ॥ जयाला नया भोग
आल्हाद वार्ता ॥ निमे तेचि कामाग्नितें जे द्रवार्ता ॥ ५१ ॥ रतांतीं तिच्या त्या
सुखाच्या समुद्रा ॥ पडे वर्णितां मौन याचे स मुद्रा ॥ सुखीं मग्न सर्व प्र
तीती सतीच्या ॥ उरे स्फूर्ति वृत्ती मधें तीस तीच्या ॥ ५२ ॥ निजानंद सिंधू-
मधें जेविं योगी ॥ सुखें मज्जती कल्पनेच्या वियोगीं ॥ गळां हस्त वक्ष-
स्थळीं कृष्णजीच्या ॥ रतांतीं दडे कामना पूर्ण जीच्या ॥ ५३ ॥ जरी शक्ति
त्या कामना वामनानें ॥ कथा वर्णिल्या चिन्तवनावा मनानें ॥ तरी निर्गुणा-
त्मत्व देखवनारी ॥ मना आवडे कृष्णलीलावतारी ॥ ५४ ॥ नया तों कथा
मन्मथा धायकांच्या ॥ दिनोद्धारका द्वारका नायकाच्या ॥ सकामा जरी
भोगयां काम वारे ॥ तरी चित्त लागो घनश्याम वारे ॥ ५५ ॥ ह्मणोनीच
वर्णीतसे वामनाची ॥ अशी वैखरी हेचि सेवा मनाची ॥ सुखीं वर्णितां

ग्रंथ हा केशवाचा ॥ अहो चाळिता तो ऱ्हषीकेश वाचा ॥५६॥ कथा वर्णिली जे भुजंगप्रयातें ॥ असें वर्णिलें जेथ राधाप्रियातें ॥ असे नाम राधा भुजंग प्रबंधा ॥ हरी कीर्तनें वर्णनें क्षिप्रबंधा ॥५७॥ इति राधाभुजंग संपूर्ण

## अथ रासक्रीडाप्रारंभः

मालिनी:- करुनि नमन गोपीवल्लभाच्या पदातें ॥ कथिन चरित त्याचें जें भवातें हरीतें ॥ वरदवर दयेनें दे ब्रजीं कामिनीला ॥ मनिं धरि रमणें त्या देखतां यामिनीला ॥१॥

द्रुतविलंबित:- प्रगटतील शरदृतु कामिनी ॥ तयिं तुह्मीं मजसीं ब्रजकामिनी ॥ रतिरमाल तमाल तनू असा ॥ वर वदोनि ह्मणे स्वस्करवें असा ॥२॥

भुजंगप्रयात:- शरत्काळ जाती फुलें पुष्पजाती ॥ नदी तीरिंचे मोगरे कुंदजाती ॥ असें देखिलें आपल्या त्या वरातें ॥ करूं सत्य हें वाटलें श्रीवरातें॥३॥

वसंततिलका:- पूर्वेस पूर्ण उगवे शशि त्या स्वकाळीं ॥ दे औषधीस स्वरवते स्वस्करवा स्वकाळीं ॥ दिक्सुंदरी मुख उटी पति यामिनीचा ॥ जाणो सुकुंकुम करें प्रियकामिनीचा ॥४॥ चंद्रप्रभा करिनिहो रविमंडळाला ॥ देखोनि त्या हरि अखंडित मंडळाला ॥ जो वाजवी स्वरगती ब्रजराज पांवा ॥ नाशावया मरण तीव्र जरा जपावा ॥५॥ तो इंदु सुंदर रमा वदना समान ॥ देखोनि दे ब्रजवधू वदनास मान ॥ कीं या अगे ह्मणुनियां ब्रजराज पांवा जो वाजवी हरिमना चतुरीं जपावा ॥६॥

इंद्रवज्रा:- कृष्णानुरक्ता पहिल्याच होत्या ॥ वेणुध्वनी आयकती अहो त्या आधींचि कृष्णीं सकळा सकामा ॥ पांवा करी फारचि वृद्धि कामा ॥७॥

स्वागता:- वेणु तो परिसतां ब्रजदारा ॥ चालिल्या त्यजुनियां गृह दारा ॥ टाकिलीं सकळही गृहकामें ॥ व्याकुळा परम होउनि कामें ॥८॥

द्रुतविलंबित:- दुहिति त्या त्यजिती निजदोहनें ॥ मन असें हरिलें मनमोहनें त्यजुनि रांधण वाढण धांवल्या ॥ त्वरित कृष्ण पदा प्रति पावल्या ॥९॥ स्तन धरूनि पितां मुखिं लेंकरें ॥ त्वरित सोडुनि ते जननी करें ॥ द्विरद गजगतीं गजगामिनी ॥ हरिस पावलिया ब्रजकामिनी ॥१०॥

मालिनी:- त्यजुनि पति सदे कीं सेवितां त्या पतीतें ॥ मधुर मुरलि मोहें पा-

वल्या श्रीपतीतें ॥ त्यजूनि अशन आल्या त्यांचिया आननातें ॥ कवळ ह-
रिस त्याही पावल्या काननातें ॥ ११ ॥

स्वागता:— कृष्णगीत रुचतां श्रवणातें ॥ कर्मकांड रुचि दे कवणातें ॥ भीक कां
नृपतिनें उकळावी ॥ या कथेंत अशि गोष्टि कळावी ॥ १२ ॥

द्रुतविलंबित:— परिसतां व्रजराज कथारसा ॥ मधुपचित्त मिळे पदसारसा
करिति कर्महि ते नर मागती ॥ परि कथाचि तया परमागती ॥ १३ ॥

उपजाति:— कथा रसीं चित्त निमग्न सारें ॥ कर्में जडें सर्व तया असारें ॥ व्यत्यस्त-
होनें जरिनें करावें ॥ कां काननीं शब्दिचरें भरावें ॥ १४ ॥

वसंततिलका:— सव्यें करूनि करितो पितृतर्पणातें ॥ यज्ञोपवीत अपसव्य सु-
तर्पणातें ॥ देवां स्वधा ह्मणउनी यजितांच देतो ॥ स्वाहा ह्मणोनि पितरांति-
ल पिंड देतो ॥ १५ ॥

इंद्रवज्रा:— व्यत्यस्त ऐसें करि कर्म सारें ॥ ज्याला हरीचीं श्रवणादि सारें ॥ आल्या
तशा वेणुरवें करूनी ॥ व्यत्यस्त वस्त्राभरणें धरूनी ॥ १६ ॥

शिखरिणी:— करीं शेले शाला कनकमय ओलीं मिरवती ॥ शिरीं नेसायाची
धरिति वसनें दिव्य युवती ॥ पदे बाळ्या नाकीं श्रवणिं झळके नाशिक-
मणी ॥ हरीतें जे पावे वरि भलतिसें तेचि रमणी ॥ १७ ॥

भुजंगप्रयात:— नव्हो वीतरागी धरी लोकरीती ॥ हरी प्राप्त विघ्नें असीं जे करी-
ती ॥ स्वमाता पिता बंधुसंतान वारी ॥ तया मानितो अंतरें दानवारी ॥ १८ ॥

द्रुतविलंबित:— स्वजन वर्जिति जे हरिसेवनीं ॥ कुशळ लंघुनि त्यास वसो वनीं
व्रजवधू गमनीं शक वैखरी ॥ प्रगट गोष्टि असीच वदे खरी ॥ १९ ॥

शिखरिणी:— पिता माता भ्राता स्वजन जरि गोपीस वरजी ॥ तरी आल्या जे-
थें वनिं कमलजा प्राणवरजी ॥ हरीतें पावावें त्यजुनि सकळांतें शठ
जनीं ॥ प्रवर्तावें ऐसें कुशळ मतिनें आश भजनीं ॥ २० ॥

वसंततिलका:— आल्या अशा जवळि ज्या व्रजगोप दारा ॥ देणें असेच सुख
त्यांस तया उदारा ॥ ऐसें असोनिहि विपर्ययता वदावी ॥ शब्दांत कीं स्वग-
ति भक्ति नई वदावी ॥ २१ ॥

शिखरिणी:— सभाग्याहो येणें मजजवळि हे उत्तम परी ॥ करूं कैसें बोला प्रि-
य तुमचियाही तदुपरी ॥ व्रज स्वस्थ क्षेम प्रथम मज सांगाच सकळा

कळावें कां ऐशा पळत तुह्मि आल्यात विकळा॥२२॥

भुजंग०-ह्मणे गोपिकांतें अघाचा अराती॥ तुह्मी गोजिन्या आणि हे घोर राती॥ जयांचा दिसे सूक्ष्म दृष्टीस-माज॥ स्त्रियांचा असा काननीं ये समाज॥२३॥ करीती गजव्याघ्र मोठे चपेटे॥ विषें तक्षकाच्या भडाग्नीच पेटे॥ मरे जो भरे या वनीं आड वाटे॥ तयाची तुह्मां कायही चाड वाटे॥२४॥

वसंतति०-या लागिं मूढपणहें सहसा त्यजावें॥ वेगें व्रजासि परतोनि अगत्य जावें॥ काढी मुखामधुनि शब्द असा हरी तो॥ जाणों तया प्रबल अंतक तो हरीतो॥२५॥

द्रुतविलं०- मुखपणें मुख इंदुचि बोलतो॥ परि करी प्रलयार्कचि बोलतो॥ ह्मणुनि पाहति त्या न तदानना॥ प्रभु ह्मणे अवलोकिति कानना॥२६॥

भुजं०- पहायासि आलों असों काननातें॥ अहा वाटलें हें मृगांकाननातें॥ असें त्यासि वाटे ह्मणूनी हरी तो॥ स्वशब्दार्थ दाऊनि चित्तें हरीतो॥२७॥

द्रुतवि०- वन विचित्र असें तुह्मिं देखिलें॥ स्वहृदयीं कुसुमांकित रेखिलें॥ लखलखा परिपूर्ण सुधाकरें॥ विववि जो अवघी वसुधा करें॥२८॥

स्वागता- मंद वेग यमुनापवनाचे॥ लक्ष पल्लव समीप वनाचे॥ देखिल्या सकळ कौतुकरीतो॥ ज्या मनास सुखहेतु करीतो॥२९॥

द्रुतविलं०- वन असें तुह्मि सुंदर पाहिलें॥ परि गृहीं गृहकारण राहिलें॥ हुडकिती सुतबंधु पिता पती॥ तडफडूनि तुह्मांवरि तापती॥३०॥ हरिकडे न पहाति चहूंकडे॥ नयन चाळिति तों शर गोकडे॥ हृदय भेदिति यास्तव त्या वधू॥ प्रभुसि पाहति कीं वधितो विधू॥३१॥

भुजंग०- जरी पावल्या दुःख पोटांत नारी॥ पहातीच सप्रेम त्या पूतनारी॥ अशा तें पुनः होय जे शल्य वाणी॥ वदे ते न जी माजि कौशल्यवाणी॥३२॥

शिखरि०-अशा स्नेहीं माझ्या जरि खवळल्या आशय असा ॥ तरी ध्यानीं कीर्ति-श्रवण गुणगानीं तुम्हि असा ॥ अशी ध्यातां गातां श्रवण करितां भक्ति कवळे ॥ न तैशी कामानें मजजवळि अत्यंत विकळें ॥ ३३॥

वसंतति०-होतो स्वधर्म मज अर्पिति मानवाचा ॥ तो एक योग करिभक्तिसु-खानवाचा ॥ स्त्रीधर्म यास्तव तुह्मीं पहिले करावे ॥ संक्षिप्त भक्तनिधि तें मग ऊकरावें ॥ ३४॥

मालिनी- निशिरिनिं पतिसेवे कारणें अंग नाचे ॥ कपटरहित धर्म श्रेष्ठ ही अंगनाचे ॥ प्रिय जनहि तयांचें पोसणें संततीचें ॥ कुळ सफळ ह्मणूनी मानिती संत तीचें ॥ ३५॥

द्रुतवि०- बहुत धर्म तिचे कथिले प्रियें ॥ गमनितीं वचनें अति अप्रियें ॥ स्मरत भग्न मनोरथ झालिया ॥ नयनिं शोकनया स्फुट आलिया ३६

वसंतति० ऐकूनि हे प्रियमुखें सुखहीन वाणी ॥ केलीं रडूनि वदनें अति दीनवाणी ॥ चिन्ताब्धिमग्न मन भग्न मनोरथानें ॥ निःकुंकुमें करि स-कज्जल नीर थानें ॥ ३७॥ ज्या कारणें त्यजिति सर्व हि गोपदारा ॥ तो शत्रुतुल्य वदतो प्रिय त्या उदारा ॥ सप्रेम कोप सहिता पशुपाळकां-ता ॥ हें बोलती पुसुनि नेत्र जल स्वकांता ॥ ३८॥

शिखरि० अहा हो गोविंदा वचन-शर हें भग्न हृदया ॥ करीती ये वाचे न दिसति तुझ्या योग्य सदया ॥ पदांपाशीं आलों त्यजुनि अबळा सर्व विषयां ॥ न आह्मांही योग्या अतिकठिण गोष्टी सविषया ॥ ३९

वसंतति०-आलोंचि ज्या त्यजुनि सर्व तुतें वराया ॥ त्यांशीं कसा वदसि अप्रिय देवराया ॥ जैसें मुमुक्षु जन सेविति वासुदेवा ॥ तैशाच कीं भजतसों तुज वासु देवा ॥ ४०॥

द्रुतवि०- तरि मुमुक्षु जनांसि दया करीं ॥ युवति या धरिं रे सदया करीं ॥ न धनमुक्तिचिही बरि कामना ॥ तुजविणें छळिती हरि कामना ॥ ४१

वसंततिः-आतां स्त्रियांस पतिपुत्र जनानुवृत्ती ॥ धर्मज्ञ तूं वदसि धर्मपथ-प्रवृत्ती ॥ तो तूंचि सर्व जगदीश गुरू विशेष ॥ झालासि तें तव पदींच पडों अशेष ॥ ४२॥

मालिनी-चर अचर तरंग श्रीगुरू सिंधुसारा ॥ तरि इतर जडलें भाविजे-

कां असारा॥ ह्मणुनि ह्मणति गोपी तूं गुरू देवराया॥ पति सुत पद तूझें तेंचि हो दे वराया॥४३॥

द्रुतवि०- धरुनि अहृय आश्रय कामिनी॥ निजगळां पडती गजगामिनी॥ जरि असो ह्मणशील भले असे॥ भजति मार्ग अनादिच हा असे॥४४॥

वसंततिं०-दुःखापदा त्यजुनि सर्व गृहस्थ तूतें॥ नित्यप्रिया भजति संत अवक्र तूतें॥ एवं दिला वर कृपा बरि तेचि साची॥ कां छेदिशी तुझिच आस बहू दिसांची॥४५॥ स्वर्गासि रक्षक मुकुंद तसा व्रजाला॥ हा विश्व मंगल तुझा अवतार ज्ञाला॥ या लागिं ठेवुनि करा अभयप्रदासी॥ नम्र स्तनीं शिरिंहि या विनवीत दासी॥ ४६ ॥

शिखरि०-गृहस्थांच्या दारा त्यजुनि गृहदारा स्वबटकी॥ फुका कां होती या ह्मणुनि हरि हो गोष्ट लटकी॥ ह्मणी मानी ऐसें मनिं भिउनि गोपी अडकरी॥ तुझे रूपें केल्या ह्मणसि गरती या विधि करीं॥४७

रथोद्ध०- वक्र मंडित सुरत्न कुंडलीं॥ तेज तें उभय गंडमंडळीं॥ देखतां सरळ रम्य नासिका॥ होतसों फुकट सर्व दासिका॥ ४८॥

द्रुतवि०- अधर शोणित पातळ चांगले॥ खदिर-पर्णरसें अति रंगलें॥ अमृत इच्छुनियां दिन यामिनी॥ बटकि होत असों व्रजकामिनी॥४९

द्रुतविलंबित- भ्रमर वारति केशचिमस्तकीं॥ मुखसरोरुहलंपट मस्तकीं॥ सरस हास्य निरीक्षण तें करी॥ वदन तें करितें अजि किंकरी५०

स्वागता- रक्षिले शरण लोक उदंड॥ ते हरी अजि तुझे भुजदंड॥ योजिती स्मरमना प्रमदासी॥ होतसों फुकट यास्तव दासी॥ ५१॥

इंद्रवज्रा- या सुंदरा देखुनियां वरारे॥ दासी नव्हे कोण हरे मुरारे॥ शोभेस त्या लुब्ध रमा रमाया॥ तूझी अजी नंदकुमार माया॥५२

स्वागता- ज्या अशा तदधरामृत दासी॥ जाळिशी स्मरदवें प्रमदासी ने दिशी जरि जितामृत लाहों॥ मेलिया बरि धरूं तुजला हो॥५३॥

मालिनी- स्मरण मरण काळीं सद्य होतांचि वाचे॥ परम पद पदातें नेति ज्या माधवाचे॥ स्मरत मरत आहों त्यासि त्याचे वियोगें॥ तरि गति हरि आह्मां योगियां जेविं योगें॥ ५४॥

शिखरिणी– तुझ्या गोडा गीतीं हसित अवलोकीं उजळतो॥ तया कामाग्नीनें व्रजजनवधूवृंद जळतो॥ ह्मणूनी जी पाजीं त्वरित अधराच्या स्व अमृता॥ वियोगाग्नीनें जों नव्हति तुझिया भस्महि मृता॥ ५५॥

द्रुतविलंबित– स्मरहुताशन हे तुमचे पती॥ विनविता ह्मणशील रमापती॥ तरि तुझें पद हें जयिं देखिलें॥ न तयिं पासुनि हे प्रिय लेखिले॥ ५६॥ मुख सुधाकर टाकुनि कांमना॥ मृगजळीं उपजे अतिकामना॥ ह्मणुनि पाजुनियां अधरामृता॥ जिववि मत्सर अद्रिधरा मृता॥ ५७॥

मालिनी– पर नर जरि गातो गोड तो चांगला हो॥ न करिति कुलनारी आपुला अंग-लाहो॥ ह्मणशिल तरि कोण स्त्री तुतें जी न मोहे॥ इतर-पुरुष-वार्तादेव देवा नमो हे॥ ५८॥

शिखरिणी –तुझ्या या वेणूचा ध्वनि मृदु जगन्मोहन मनीं॥ निघे जीच्या ते स्त्री कवण कसि जे मोह न मनी॥ जया रूपें गाई मृग तृण अगाई विसरती॥ कुळाचारीं नारी तुजविण हरी केविं सरती॥ ५९ अनायासें चित्तें हरुनि ह्मणसी जा स्वसदना॥ कसें जावें सांगा त्यजुनि मन जी इंदुवदना॥ तनू राहूं देशी न पद चळतें पाउल हरी॥ कसें जावें ऐसें तरि अजि ह्मणावें हरि हरी॥ ६०॥

उपजाति– खुपेल हा शब्दचि जेविं कांटा॥ ह्मणेल येथूनि तुह्मी निकाटा॥ या लागिं पोटांतिल कोप जाया॥ काकूळती बोलति गोपजाया ६१

इंद्रवज्रा– चित्तें जया ये स्थळिंहून जावें॥ चित्तें जया भर्तृसुखा भजावें॥ तें चित्त चित्तें अवघें हरूनी॥ कां जा ह्मणावें हट हा धरूनी ६२

उपजाति– ॥जाऊनि गेहीं गृहकृत्य कांहीं॥ करावया शक्ति करादिकां हीं॥ चित्तेंचि येते परि ते हरूनी॥ कां जा ह्मणावें हट हा धरूनी ६३

स्वागता– ये स्थळींहुनि कशा तरि जाच॥ स्वामि तूं करिशि हा जरि जाच॥ पाय पाउल न येथुनि जाती॥ चित्तहीन विषयेंद्रिय जाती॥ ६४

उपजाति –स्वकर्म हें याहि कुळीं कराया॥ चित्ताविणें शक्ति न देवराया आतां अजी काय तरी करावें॥ मार्गा तरी जी कवण्या भजावें ६५

मालिनी– अघटित हरि आलों तूजपासूनि जाणें॥ तदपि करणि तूं

ह्मी आयकावी स्फकानें॥ चळति चरण तूझे चित्त तें जो हरी तो॥ निज पद निकडेही जीकडे श्रीहरी तो॥६६॥

शिखरिणी — न येथूनी जेव्हां टळत पद येथें तुह्मि असा॥ स्वयें जातों वेगें ह्मणुनि पळशी तूं जरि असा॥ तुझ्या पायीं चित्तें चलन तुज संगेंचि चरणा॥ न सोडी जी तूतें त्यजसिल कसा सांग शरणा ६७

उपजाति — धांवों स्वयें तूं जरि तीव्र जाशी॥ परंतु जाऊं न कधीं ब्रजासी॥ कीं देहचक्रा हरि चित्त दोरी॥ शिंक्या सवें जेविं फिरे शिदोरी॥ ६८॥

वसंततिलका — हे आयकूनि शरणागत कामिनींची॥ देखूनि भक्ति मद कुंजर गामिनींची॥ हांसे दयें करुनियां सकळांस पाहे॥ त्यांशीं रमे करि रमेहुनि कीं कृपा हे॥ ६९॥

मालिनी — सदय ह्रदय जेव्हां कृष्ण गोपींस पाहे॥ विकसित मुखपद्में होति होतां कृपा हे॥ उडुपति-सह तारा ये रिती गोपदारा॥ मिरवति यदुवीरा भोंवत्या त्या उदारा॥७०॥

स्वागता — कृष्णगायनविलासकलांतें॥ त्यांस दावित कळा सकळांतें॥ घेउनी फिरतसे गजरानें॥ हस्तिनी सह जसा गज रानें॥७१॥

वसंततिलका — स्त्रीवृंद आधिन करून मनांत राकी॥ आणी तया हरि अशा यमुना तटाकीं॥ जेथें समीर स्फख दे स्थिर जंगमाला॥ सेवूनियां कुमुदमंद तरंगमाला॥७२॥

स्वागता — दाखवी स्मरविलास कलांतें॥ कोण वर्णिल तयां सकळांतें॥ चेतवी मदन तृप्त करूनी॥ बाळचंद्र करजीं उकरूनीं॥७३॥

वसंततिलका — आत्मत्वयोग परिपक्वहि दक्ष जाला॥ होऊनि तृप्त हि भजे च अधोक्षजाला॥ कामाग्नि ये रिति विझूनि रतिप्रसंगें॥ पेटे पुन्हा त्वरित माधव विप्रसंगें॥७४॥ क्रीडेत जे स्फरतसंभ्रमभाव दावी॥ ते कामशास्त्रमति काय विभा वदावी॥ संक्षेप रूप ह्मणऊनिच ते शफकानें॥ श्लोकैकमात्र कथिली रति कौतुकानें॥७५॥७

इंद्रवज्रा — इत्यादि देतां रतिरंग लाहो॥ गोपींस वाटे रति रंग लाहो॥ आम्हीं सुरूपा त्रिजगांत नारी॥ हा मोहला यास्तव पूतनारी॥७६

उप॰—मनींच इत्यादिक गर्व झाला॥ या गोष्टिचा देव न तो भुकेला॥ हा-

गर्व जेथें न वसे हरी तो॥ सा शत्रु कामादिक जो हरीतो॥ ७७॥ त्याचा हरावा मग गर्व सारा॥ तेव्हां गमे यारिति विश्वसारा॥ अदृश्य त्यांच्या नयनांसि जाला॥ कीं गर्व सोसे न अधोक्षजाला॥ ७८॥ ७॥

मालिनी- बहु धन अधनाचें हारपे सांपडूनी॥ त्यजून सकळ धुंडी मोह फांसा पडूनी॥ हरिविण हरिपीसें लागलें कामिनीतें॥ करुनि हरि चरित्रें कंठिती यामिनीतें॥ ७९॥

उपजाति- मिळूनि गाती सकळा हरीतें॥ गाणें जयाचें अशुभा हरीतें या नंतरें त्या व्रजगोपदारा॥ रात्रीं वनीं धुंडिति त्या उदारा॥ ८०॥

शिखरिणी- वदे हो कल्याणी हरिचरणगोडी अनुळशी॥ दिसे तूझ्या गात्रीं ह्मणुनि पुसतों माय तुळशी॥ तुझी माला कंठीं भवकलभ कंठीरव धरी॥ असे कोठें झाला अनलविरहाची च लहरी॥ ८१॥

वसंततिलका- रे चंपका कुरबका तिलका अशोका॥ छेदा अरे त्वरित कृष्णावियोग शोका॥ जो दे तुह्मांसि सुख लावुनियां करांतें॥ दावा तया स्वसुखसिंधुसुधाकरातें॥ ८२॥ कोणी नयांन अबला पुसते क्षितीतें॥ रोमांचरूप दिसतो तृणवृक्ष जीतें॥ कीं कृष्णपादतळ लागलिया विनाही॥ होणार तें सुख असें घडणार नाहीं॥ ८३॥ तूझ्यातपान तुलना क्षितिलेश वाचे॥ मोजूनि पाय जिस लागति केशवाचे॥ जो स्पर्श उत्सव मनांनिल भावदावी॥ प्रेमांकुरीं ननु चिही किति भावदावी॥ ८४ गोवर्धनस्तनतटीं हरिच्या परांतें॥ स्पर्शूनि दाविसि अशा तनुसंपदांतें॥ पाय त्रिविक्रमपणीं नधिं तूज लागे॥ हें काय तें सुख पुसों क्षिति तूज लागे ८५ तो कृष्णविक्रम ननू ह्रय पाद पद्मा॥ तूं स्पर्शलीस करि वास जयांत पद्मा॥ किंवा वराहपणिं हें सुख पावलीस॥ आलिंगनें करुनि फार सुखावलीस ८६

भुजंगप्रयात- अशा धुंडिती तों लता एकवारे॥ दिसे तीस तो ठाउका कृष्ण वारे॥ फुलें खुंटिलीं कृष्णजीनीं सदेवें॥ नखस्पर्श केला ह्मणे ईस देवें॥ ८७॥ नखें आपणा स्पर्शला कैटभारी॥ गुढ्या देह रोमांचरूपें उभारी॥ लतेच्या शरीरासि कांटे स्वभावें॥ ह्मणे ते नखांच्या सुखाच्या प्रभावें॥ ८८॥ [illegible] फळा पल्लवांच्या॥ तया पूसती त्या स्त्रिया बल्लवांच्या॥ [illegible] कृष्णा नथा वंदनातें॥ दुरूनीच नंदा-

चिया नंदनातें ॥ ८९॥ असें धुंडितां देखिले पाय त्याचे ॥ वनीं आ-
त्मयाच्या प्रिया आत्मयाचे ॥ निशा चांदणी पायविन्यासमुद्रा ॥ प-
हाती स्मरूनी तयाचित्तमुद्रा ॥ ९०॥

शिखरिणी– अगाई कृष्णाचे चरणनळ हे कीं मिरवती ॥ ध्वजी पद्मी व-
ज्री करुन ह्मणती सर्व युवती ॥ अचिंत्याच्या पायांविण परम चि-
न्हेंचि नसती ॥ अशी जे ते बोले भरुनि उदकें लोचन सती ॥ ९१ ॥

वसंततिलका– जो रेणु दुर्लभ स्मरांसि महा उपायीं ॥ देखूनि ते धर-
णिं मंडित कृष्णपायीं ॥ अन्योन्य त्या वदति दुर्लभ लाभवार्ता ॥ आ-
रोग्य जा श्रुतिसुखा करिती भवार्ता ॥ ९२॥

मालिनी– चरण-रज सयाहो धन्य या श्रीपतीचें ॥ शिरिं धरुनि कृतार्था-
होतसे श्रीपतीचें ॥ भवकमलभवादी आपुला ताप जाया ॥ मिरवि-
ति मुकुटीं तें लाधल्या गोपजाया ॥ ९३॥

द्रुतविलंबित– वदति गोळिणि ये रिति लोळती ॥ हरिपदाब्जरजीं अ-
जि लोळती ॥ बसति मागुति विस्मित बोलती ॥ त्यजुनि शब्द मुखें
मग डोलती ॥ ९४॥

भुजंगप्रयात– असें धुंडितां धुंडितां त्याच मार्गे ॥ पदें दूसरीं देखिलीं
त्याच मार्गे ॥ हरीच्या पदाच्या रजांचेचि संगें ॥ वधूंचीं पदें देखि-
लीं त्या प्रसंगें ॥ ९५॥

वसंततिलका– दुःखाग्नि जों किमपि कृष्ण पदीं विझाला ॥ तों दीसम-
त्सर सवेंचि समीप आला ॥ गोष्टी मुकुंदपद भक्तिचिया उडाल्या
सापत्न मत्सर जळीं युवती बुडाल्या ॥ ९६॥

शिखरिणी– अहाहा हें पाहा अमृत मथितां तें विष महा ॥ उदेलें-
कीं जाला सम सदय आत्मा विषम हा ॥ समा आह्मी रामा चतुर
अभिरामा परि हरि ॥ रमे तो एकीशीं लपन मग आह्मां परि हरी ९७

द्रुतविलंबित– लपत तों अबला सकळा वधू ॥ वधुहि तो बरवा परि हे व-
धू ॥ गिरिधराधर एक फुका पिते ॥ स्वपद लावुनि काळिज कापिते ॥ ९८
हरिपदीं पथ जो विमल क्षिती ॥ चरण त्यांमचि ते समल क्षिती ॥ नि-
कट चालतसे गजगामिनी ॥ ह्मणुनि तर्क उभारिति कामिनी ॥ ९९ ॥

बहु इणेंचि असे हरि पूजिला ॥ सवतिरूप दिसे न रिपू जिला ॥ त्य-
जुनियां सकळा ब्रजनायिका ॥ परम जे रुचली ब्रजनायका ॥ १०० ॥

भुजंगप्रयात— पुढें पाय तीचे न देखूनि वाटे ॥ कडे घेतलीसे असें त्यां-
सि वाटे ॥ हरीचीं पदें रूतलीं खोल भारी ॥ गमे भार वाहे निचा कें-
ठभारी ॥ १०१ ॥

द्रुतविलंबित— पद तिचे दिसती न अलीकडे ॥ तरि असेलचि बैसलि
तीकडे ॥ उचलिली मनिं मानुनि भीरु ते ॥ तृण शिखा झणि तीस उ-
भी रुते ॥ १०२ ॥

भुजंगप्रयात— पहा गोपिका हो कसा कृष्ण कामी ॥ कसे घेतसे भोग
तेही रिकामी ॥ अशा बोलती आणि धुंडीत जाती ॥ पथीं त्याचत्या
देखती पुष्पजाती ॥ १०३ ॥ प्रियानें प्रिये कारणें जेविं हार ॥ स्वयें गु-
फिलं दीसतां तो विहार ॥ अशीं लक्षणें लक्षितां कासयाहो ॥ न वा-
टे खरें त्या पहायास याहो ॥ १०४ ॥

शिखरिणी— न सारे हे पाय क्षितिस रुतले अर्ध चवडे ॥ तिच्या ऐशा
चिन्हें करूनि तरि हे गोष्ट निवडे ॥ स्वजानुद्वंद्वीं ती बसवुनि पुढें वि-
श्वशरण ॥ स्वयें वेणी घाली उमटति असे अर्धचरण ॥ १०५ ॥

वसंततिलका— ठेवी गजीवरि करी करपुष्करातें ॥ संधी तिच्या हरि त-
सा करपुष्करातें ॥ स्थापूनि चालत असे ह्मणऊनि वाटे ॥ या मत्सरें
तडफडा बहु होय वाटे ॥ १०६ ॥

भुजंगप्रयात— मऊ वाळुवंटीं बहू पुष्प जाती ॥ नवे मोगरे कुंद मंदार
जाती ॥ पदें देखिलीं त्या स्थळीं फार तीचीं ॥ दिसों लागलीं चित्रचि-
न्हें रतीचीं ॥ १०७ ॥

वसंततिलका— तेथेंचि चिन्ह अवलोकुनियां रतीचें ॥ त्या मत्सरें ह्मण-
ति पुण्य अपार तीचें ॥ कीं गुंफितां शिरिं फुलें बसला रमाया ॥ दे-
खूनियां तिचिच नेत्र-विकार-माया ॥ १०८ ॥

द्रुतविलंबित— पद तिचें अबला जन लक्षिती ॥ ह्मणति देखुनि हे मृ-
दुल क्षिती ॥ उतरुनी कुसुमें ब्रजशेखरें ॥ विविध तोडुनि तीस
दिलीं करें ॥ १०९ ॥

स्वागता– तो स्वयें हरि अखंड विरक्त॥ स्त्रीजनीं प्रभु न जो अनुरक्त॥ कल्पवृक्ष फळ दे भजनाचें॥ वाक्य हें जलज- नाभ- जनाचें॥११०

इंद्रवज्रा– स्वांदा कडे घेउनि देव दावी॥ कामी जनाची गति हे वदावी॥ कामातुर स्त्री वश ज्या प्रकारें॥ दावीतसे बद्ध जनानुकारें॥१११॥

शिखरिणी– असेल स्त्री वृंदीं किमपिहि दुरात्मत्व घडलें॥ तरीच श्री कांता सह विहरणें हें बिघडलें॥ सदोषा कीं आह्मीं विरह-फळ दावी परम तो॥ भली ते कीं सर्वां त्यजुनि हरि तीशींच रमतो ११२

भुजंगप्रयात– विझाला असें बोलतां क्षिप्र ताप॥ प्रियाच्या पदाच्या रजाचा प्रताप॥ तरी भ्रांतचित्ता न सोसे वियोग॥ स्त्रिया धुंडिती कीं घडो जेविं योग॥११३॥

वसंततिलका– तो डोलही त्यजुनि चित्त हरीस पाहे॥ दे अंगसंग हरि त्याहुनि ही कृपा हे॥ एवं च तें स्थळ हि सांडुनि त्या उदारा॥ मागें तया हुडकिती पक्षपालदारा॥११४॥

उपजाति– अदृश्य एथें जलजाक्षजाला॥ जाणों तदा रम्य अधोक्षजाला जो आमुचा नंदकुमार साचा॥ हा मोह ज्याच्या पदसारसांचा ११५ स्कंधीं स्त्रियांच्या भुजदंड भारी॥ ठेवीतसे जो मधुकैटभारी॥ सरोजपाळ्या स्वकरें उदारा॥ दावा तया बोलति गोप-दारा॥ ११६॥ ७॥

भुजंगप्रयात– तुह्मां आम्रवृक्षांसि किंवा कदंबा॥ पुसां आणि का ही तरूच्या कदंबा॥ तुह्मी वंदितां ज्यासि जो मेघ-काय॥ पहातां कृपेनें नमस्कार काय॥११७॥ अशा धुंडिती तो मृगी एक वारें॥ दिसे ठाउका कृष्ण तो तीस वारें॥ ह्मणे पाहतां माधवाच्या मुखातें॥ पहा-लाधली लोचनी या सुखातें॥११८॥

वसंततिलका– तो वाटला जवळि त्यासि जगन्निवास॥ ये कुंद मंद कुचकुंकुम मिश्रवास॥ कीं कुंदपुष्पकृत जो प्रभुकंठ हार॥ घ्राणीं नयाव रिल वायु करी विहार॥११९॥

भुजंगप्रयात– न केला मनीं गर्व तो गोपजाया॥ स्वयें योग्य झाली अशी हे सजाया॥ तिनेंही बहू मानिलें आपणातें॥ हरी अंतरे त्या धणी

मीपणातें ॥ १२० ॥

वसंततिलका– सर्वांत मी बरि ह्मणूनिच एकलीला ॥ त्यांतूनि आणूनि करी मकरांक-लीला ॥ ऐसा मदें करुनियां तिस गर्व जाला ॥ ह्मा-ठें वदे वचन हें गदपूर्वजाला ॥ १२१ ॥

स्वागता– भागलें अजि न चालति पाय ॥ काय यासि करितोसि उपाय ॥ पाहिजे जरि असें तुज वाटे ॥ वागवूनि नरि ने मज वाटे ॥ १२२ ॥

वसंततिलका– दे उत्तर प्रभु न होत विलंब ईस ॥ स्कंधावरी तरि ह्मणे हरि येच बेस ॥ देखूनि नम्र उचली पद सार साक्षी ॥ तों गुप्त हो-य प्रभु सार असार साक्षी ॥ १२३ ॥

उपजाति– गोपी न देखे जशि लोकपाला ॥ हाणूनि घे आपुलिया कपा-ळा ॥ म्यणे शिवे गर्व जिच्या मनातें ॥ भोगील कैसा सुखधाम तातें ॥ १२४ ॥

शिखरिणी– ह्मणे कृष्णा कोठें त्यजुनि अजि गेलास मजला ॥ अनर्था-चा हेतू त्वरित मज नाहीं समजला ॥ तुझी मी तों दासी ह्मणि मज उदासीन गमसी ॥ फिरेन श्रीकांता रमत तुजशीं जेवि रम-सी ॥ १२५ ॥

द्रुतविलंबित– विविध भोगितसूनि हि सोहळे ॥ उपजले मज गर्वित डोहळे ॥ निज शरीरचि म्यां अभिमानिलें ॥ प्रभु तसि गर्व-भरें अ-पमानिलें ॥ १२६ ॥

उपजाति– परोपरी स्वप्रिय कोप जाया ॥ आक्रंदली ये रिति गोप जाया तयेंचि ही दूरि तथापि कानीं ॥ ते ऐकिली वेरवरि गोपिकानीं १२७

इंद्रवज्रा– ज्यानें वधू धुंडितसे स्वकांता ॥ आकांत हा ऐकति गोपकां-ता ॥ धांवूनियां त्या पुसती तयेतें ॥ टाकूनि गेला प्रिय जीस ती-तें ॥ १२८ ॥

शिखरिणी– ह्मणे ती बायां हो बहु मजसिं गोविंद रमला ॥ अशाला-डें जाला बहुत ह्रदयीं गर्व मजला ॥ हरी येणें जातो ह्मणुनि मज नाहीं समजला ॥ अहो बाई गेला मग विधि असा हो उमज-ला ॥ १२९ ॥

मालिनी – दचकति वचनें त्या सर्वही गोपजाया ॥ ह्मणति अवधियांही हेतु हावी त्यजाया ॥ त्यजुनि सुख पथातें कष्टलों आड वाटे ॥ ह्मणवुनि अबलांतें हा स्वअन्याय वाटे ॥ १३० ॥ नवल करुनि जी तीराहिली सारसाक्षी ॥ जिस तिस हरि वाटे सर्वसंसार-साक्षी ॥ फिरवि विषय त्यासी इंद्रियादीक गाई ॥ पशुपतनय आम्हीं मानिला तो अगाई ॥ १३१ ॥

द्रुतविलंबित – हुडकिती मग ती सह कामिनी ॥ चहुं कडे फिरती गजगामिनी ॥ शशिकरें न दिसे अति सत्तमीं ॥ हरि अदृश्य गमे निबिडा तमीं ॥ १३२ ॥

मालिनी – समजति न कितेकीं ज्ञानसिद्धिप्रदाया ॥ धरुनि अगुण मार्ग कुंशकृत् सांप्रदाया ॥ श्रम विफळ पहातां मागती ते अजाला ॥ भजति मद वधूंचा येरिती दूर झाला ॥ १३३ ॥

वसंततिलका – आत्मा मनीं स्फुरतसे व्यतिरेक रीती ॥ तो अन्वयें जडचिनिश्चय हा करीती ॥ गर्वें न तो मनिं दिसे मग नेश्वरांत ॥ अद्वैत केवि गवसे जगदेश्वरांत ॥ १३४ ॥ चंद्रप्रकाशक मनीं न दिसे हरी तो ॥ त्या चाळवूनि मद ये रिति जो हरीतो ॥ गर्वें जसें मुनि न देखति बोध मानी ॥ कीं चंद्र तोचि मति सर्व मनोभिमानी ॥ १३५ ॥ आत्मा न देखति मनीं व्यतिरेक रीती ॥ गर्विष्ठ ते जडचिदैक्य मुखें करीती ॥ जाणूनि अन्वय जडैक्य दिसे न कांहीं ॥ ऐसा तमांत हरि मानिति गोपिकाही ॥ १३६ ॥

द्रुतविलंबित – जड तरंग चिदब्धि च भासते ॥ परि तमोगुण मात्रचि भासतो ॥ हरि समीं न दिसोनि गमे असें ॥ घटनि बोध मदान्वित हे असें ॥ १३७ ॥

भुजंगप्रयात – प्रकाशीं शशीच्या हरी सांपडेना ॥ नसूनी तमा भाजिठायी पडेना ॥ असें बोलतां भाव हा व्याम-देवं ॥ असा दर्विला कीं पहावा सदेवें ॥ १३८ ॥ मनातें जरी गर्व टाकूनि योजी ॥ ह्मणे ध्यान योगांत तो देव योजी ॥ तरी वो बळें स्पर्शता मापणातें ॥ हरी त्यासि नेदी शिवों आपणातें ॥ १३९ ॥

मालिनी – व्रजपति-यश गंगे न्हाणिलें त्यास देवें ॥ स्व मन तरि शिवोंही

दीधलें त्यांस देवें॥ ह्मणुनि सकळ गोपी- वृंद तो गीत गाय॥ मिळ-
ति शुक मुखें ते भक्ति लोकीं न माय॥ १४०॥

द्रुतविलंबित- परि जया यमुना- पुलिनीं हरी॥ करुनि गुप्त तनू मदसंह-
री॥ धरुनि तेंचि तटीं मृदुलक्षिती॥ हरिस गाति तदन्य न लक्षि-
ती॥ १४१॥

उपजाति- ज्या भूमिके श्री नवमेघनील॥ गमाविला सुंदर इंद्रनील॥ त्या
भूमिके वांचुनि सांपडेना॥ अन्यत्र ठायीं पदरीं पडेना॥ १४२॥ अद्वै-
तभूमीवरि गर्व झाला॥ गमाविले त्या गदपूर्वजाला॥ तरी प्रसन्न
प्रभु तोचि केला, धरूनियां त्याचि सुभूमिकेला॥ १४३॥

शिखरिणी- पुन्हा या अद्वैत- क्षितिवरि हरी तो न गवसे॥ जया दिव्या
ह्मर्मी स्थिरचरपणीं तो नग वसे॥ विराळें सर्वांच्या अशुभचि मन
तें पात्र सहसा॥ नव्हे त्या ज्ञानातें भ्रमविति जया शत्रु सहसा॥ १४४

वसंततिलका- ज्या भूमिकेसि असतां मनिं गर्व जाला॥ तेथें अदृश्य म-
निं मानियलें अजाला॥ आल्या तयाच पुलिनाप्रति तें शुकानें॥ कीं
बोलिलें मनिं रहस्य धरा स-कानें॥ १४५॥

मालिनी- ह्मणवुनि पुलिना त्या मागुती गोपजाया॥ अनुसरति तथापी
मागुती कांप जाया॥ करिति हरिगुणांचे कीर्तना सुस्वभावें॥ व-
सति सकळ तीर्थें ज्या कथेंत स्वभावें॥ १४६॥

उपजाति- ह्मणूनि गाती गुण माधवाचे॥ ते कीर्ति गंगाच अगाधवाचे
येती मनें शुद्ध करूनि दाना॥ जगा नगा हाटक तें निदाना १४७
मनांत होतांच अगाध वाचे॥ विलासदेही प्रभु माधवाचे॥ पावूनि-
गाती व्रजगोपदारा॥ न देहगेहा स्मरती उदारा॥ १४८॥ ७ ॥

शिखरिणी- अशी रास-क्रीडा मदन-शर अध्याय रचिली॥ प्रवृत्तीच्या-
लीलांहूनि बहु निवृत्तीच रुचली॥ निवृत्ती वांचूनी न किमपिहि
वृत्तांत गवसे॥ दिसे ब्रह्मीं त्याला जग कनकिं जैसा नग वसे १४९

वसंततिलका- अध्याय पांच शरही धरि पांच काम॥ प्रद्युम्न अंगजज-
न्मा करि पूर्ण काम॥ केला अनंग रतिनायक शंकरानें॥ त्याला त-
नू दिधलि शंकर-शेखरानें॥ १५०॥

भुजंगप्रयात- असे पांच अध्याय हे व्यास देवें॥ करूनी दिले वर्णिले हे सुदे-
वें॥ स्कतें त्याचिया यांत अध्याय दोन॥ असे वर्णिले शब्द थोडे वदो-
न॥ १५१॥

शिखरिणी- प्रवृत्तीची लीला निजरस निवृत्तींत मिरवी॥ प्रवृत्ती वृत्तांत त्व-
रितचि निवृत्तींत फिरवी॥ भवार्त्ता हे वार्ता निववुनि विवर्त्ता परिह-
री॥ रमा भर्त्ता कर्त्ता करुनिहि अकर्त्ता परिहरी॥ १५२॥ श्रीराम्
इति रासोत्सव पूर्वाध्यायः

## रासक्रीडा उत्तराध्याय.

### पद.

गोपी ह्मणती जी गोपाळा॥ ऐसी न चव दे वनमाळा॥ ध्रु०॥ सांडूनियां
सर्व विषय॥ तुझें धरिलें चरणद्वय॥ १॥ टाकूनियां ह्रदवाद॥ अंग-
संग दे अल्हाद॥२॥ जेविं मुमुक्षु यातें हरी॥ तेविं आह्मां अंगीकारीं॥
३॥ पति पुत्र आणि स्कह्रद॥ आह्मी जाणूं तुझें पद॥ ४॥ सर्व भावें तुझें
भजन॥ करितानि कुशल जन॥ ५॥ आतां स्तनीं आणि शिरीं॥ कर ठे-
वूनि ताप हरी॥६॥ देखुनियां सौंदर्यासी॥ झालों फुका तुझ्या दासी॥७॥
देखुनियां तुज मुरारी॥ दासी कोण नव्हे नारी॥ ८॥ ऐकुनियां शरणआ-
ला॥ दास दारुनी वामन जाला॥९॥

### अभंग.

अदृश्य हरी होतां॥ हरि झाल्या गोपकांता॥ भृंग पिक ध्यातां॥ गोपाळा
१॥ एक होय पूतना॥ एक कृष्ण शोषी स्तना॥ वेधियल्या गोपांगना॥ गोपा-
ळा॥२॥ यशोदा होय एक नारी॥ कृष्ण होय एक हरी॥ बांधों जाई उदरीं॥
गोपाळा॥३॥ एक होय कालिया॥ कृष्ण होय मर्दी तया॥ ह्मणे मज समअ-
व्यया॥ गोपाळा॥ ४॥ गोपी गोप गाई होती॥ कृष्ण होय ती प्रती॥ दृष्टि-
भयें त्राही ह्मणती॥ गोपाळा॥ ५॥ कृष्ण होय ते वसन॥ धरी जाणों गोव-
र्धन॥ पाहती तैसे व्रजजन॥ गोपाळा॥ ६॥ वियोगें कृष्णपिसें॥ लागे गो-
पींतें जेसें॥ योगें वामनाच्या ऐसें॥ गोपाळा॥ ७॥

## पद.

शरदिंदु यामिनी॥ वेणुरवें कामिनी॥ जाती गजगामिनी॥ हरिकारणें॥१ कायें सर्व सोडिती॥ आर्यमार्ग मोडिती॥ गृहपाश तोडिती॥ प्रेमें हरिच्या ॥२॥ दोहनें वधूजनें॥ त्यागिलीं सभाजनें॥ चित्त भवभंजनें॥ वेधिलें असें॥ ॥३॥ एकी अन्नें काढितां॥ स्वजनासी वाढितां॥ वेणु कानीं पडतां॥ त्याही धांवल्या॥ ४॥ एकी शेष जेविती॥ एक पती सेविती॥ त्याही वेगें धांवती॥ कामविह्वळा॥ ५॥ एकी थानीं लेंकुरें॥ जाती लोटुनियां करें॥ शासनें भयंकरें॥ते निघाली॥ ६॥ विपरीत भूषणें॥ दिसती न दूषणें॥ चित्तीं व्रज भूषणें॥ वेध लाविला॥ ७॥ एकीं नाकीं बाळिया॥ कानीं मोती ल्यालिया त्याहि वेगें आलिया॥ जेथें हरि तो॥ ८॥ वडिलीं वर्जिलिया॥ पतिनीं ही गांजिलिया॥ तरि नाहीं लाजलिया॥ पावल्या हरी॥ ९॥ त्यागुनी मताभिमान स्वकूल अभिमान॥ गातो विना तान मान॥ वामन गुण॥ १०॥ श्रीशंवंदे॥

शार्दूलविक्रीडित– माळाकार परस्परें कर गळां घालूनि गोपांगना॥ गाती नाचति पाहती अवधिया एका जगज्जीवना॥ सोन्याचे मणि ओंविले भुजगुणीं गोप्या शशांकानना॥ पाचूचे पदकस्थळीं स्मरमना श्रीदेवकीनंदना॥ १॥ कालिंदी तट वाळुवंट गगनीं संपूर्ण तारापती॥ कल्हारीं कुमुदोत्पलीं अलि शरत्कालीं जलीं गुंजती॥ वारा मंद सुगंध शीतल फुलें नाना तरू शोभती॥ ऐशा यामिनिगोपिका हरिसवें रासोत्सवें क्रीडती॥ २॥ गोपी नायक इंद्रनील मिरवे मुक्ताफळांच्या कळा॥ गोप्या गोळिणि रासमंडळिं तशा मध्यें हरी सांवळा॥ कस्तूरी तिटिली कलिंदतनया श्रीरास माळा गळां॥ सौभाग्य व्रजभूमिचें पदरजें त्याच्याचि आलें फळा॥ ३॥ जे ते गोपिस आपणाच जवळी वाटे असावा हरी॥ जाणूनी जितुक्या स्त्रिया तितुकिया तत्काळ मूर्ती धरी॥ सोन्याचे मणि इंद्रनील तितुके तो हार त्याचे परी॥ दों गोपींत मुकुंद कृष्ण युगुलीं एकेक ते सुंदरी ॥४॥ सर्वांचे हरि कंधरीं भुजनया रासक्रिया मंडळीं॥ कृष्णाचे सकळां गळां भुज अशी झाली अहो सांखळी॥ एका त्या अवघ्यास्थळीं प्रकृतिही नाना दिसे वेगळी॥ गोप्या गोळिणि त्यांत एक

मिरवे कृष्णप्रभा सांवळी ॥ ५ ॥ त्या गोपी जितुक्या करूनि तितु-
क्या मूर्ती जरी नाचला ॥ ज्या त्या मानिति आपणाचि जवळी आ-
हे हरी एकला ॥ तीची तेथुनि दृष्टि ती न विघडे जो जो जिणें देखि-
ला ॥ मेघश्याम अनेकरूप रमतो ऐसें न भासे तिला ॥ ६ ॥ रूपें तीं
स्मर कल्पवृक्ष हरिचीं गोपांगना त्या लता ॥ कीं ते मेघ समूह त्या
चमकती त्या माजि विद्युल्लता ॥ कीं तारा युवती अनंत गगनीं मू-
र्ती मधें नीलता ॥ जेव्हां एकचि तेधवां उडुगणीं भूचंद्रमा खाल-
ता ॥ ७ ॥ गोऱ्या गोळिणि सांवळ्या हरि तनू रासोत्सवीं नाचती ॥
श्रीगंगे यमुने मधें तरल ते कल्लोळ आंदोलती ॥ गोपी लोचन मी-
न लोल मकर श्रीकुंडलें डोलती ॥ गोपस्त्रीकुचकुंभ तारक करी
पोंहे रतीचा पती ॥ ८ ॥ थै थै ताल समन्वयें ध्वनि उठे कीं तं ततन्न
श्रुती ॥ त्या गोपी व्यतिरेक गाउनि परब्रह्मीं अहो नाचती ॥ तेथें गा-
यक ते मुनी भ्रमर तद्वृंदां सवें गुंजती ॥ आत्मा निर्गुण विश्वउ-
द्धूरितसे श्री योग माया पती ९ कोणी लाविति नाचतां मुख मुखा
तांबूल त्याचे मुखीं ॥ कोणी मानवला हरी मजवरी ऐशाच भावें
सुखी ॥ त्यांच्या देखुनियां कळा स्तुति करी त्या त्या गुणासारखी
जे ते आवडती ह्मणे मज अशी नाहीं दुजी आणखी ॥ १० ॥ को
णी श्री भुजदंड हुंगिति गळां जे आपुल्या घातले, जे स्वाभाविक
ही सुगंध अगरू श्रीचंदनें चर्चिले ॥ कोणी आंत कुचावरी करतल
श्रीमूर्तिचें ठेविलें ॥ कोणी ओष्ठहि नाचतां मुख मुखीं घालूनिआस्वा-
दिलें ॥ ११ ॥ ऐशा कृष्ण समागमें स्मर भरें गोपांगना नाचल्या ॥ गाती
चित्र विचित्र नृत्य करितां कामातुरा भागल्या ॥ मूर्तश्रीपतिच्या
समीपचि गळां तींहीं मिठ्या घातल्या ॥ लक्ष्मी वांचुनियां अलभ्य
रतिनें गोपांगना लाधल्या ॥ १२ ॥ नानाभिन्न उपाधि घेउनि लयीं
माया निघे केवळीं ॥ श्रीमूर्ती युवती मिळोनि घडली होती अशी
सांखळी ॥ तें ब्रह्म प्रतिबिंबलें बहु घटीं जें एक एके जळीं ॥ गो-
पी एकचि कृष्ण एक रमती हूंहूं अशीं वेगळीं ॥ १३ ॥ गोपींचे मु-
ख इंदु बिंदु वरते नृत्यश्रमें निर्मिले ॥ नानारूप धरें करें सुख-

करें पीतांबरें पूशिलें ॥ कस्तूरी विण निष्कलंक बरवे एणांक ते शोभले ॥ काम व्याधि अनादि आधि जितुके ते सर्वही नासले १४ गांठी कंचुकिच्या जगद्गुरु करें गोपींचिया सूटल्या ॥ ग्रंथी चिज्जड त्या अनादि रचिल्या त्याही अहो तूटल्या ॥ कृष्णाच्या अधरामृतें अमरता तात्काळ त्या पावल्या ॥ नीवी-मोक्ष मुकुंदहस्तकमलें तो मोक्ष त्या लाधल्या ॥ १५ ॥ नेले राजसराग ते अधरिंचे श्रीवल्लभें चुंबनें ॥ दृष्टींतील निरंजनें हरपलीं जीं तामसें अंजनें ॥ जें कांचंदन सत्वही हरि हरी त्यांचें निजालिंगनें ॥ केल्या निर्गुण त्या रतान्त-समयीं गोपी जगज्जीवनें ॥१६॥ जाल्या निर्गुण त्या परंतु सगुणप्रेमेंचि जें राहिलें ॥कांहीं चंदन शफ्रता उरवुनी तें सत्वतों शोभलें ॥ स्वानंदांत बुडी रतान्त-समयीं देऊनि तें ठेविलें ॥जीवन्मुक्तपणें हरीस सकळी तेणेंचि आलिंगिलें ॥ १७॥ ब्रह्मीं नित्यसुखानुभूतिरस त्या रंगेंचि जें रेखिलें ॥कीं पुण्यार्णव देवकी-जठरजें त्याही मिषें ओतिलें ॥गोपींच्या कुचकुंकुमें करुनियां माळा गळां माखिली ॥ क्रीडांतीं हरिमूर्ति सावधपणें ती एकली देखिली ॥१८॥ गोपींच्या स्थिरजंगमा सहित जो त्यांच्या पतींचा हरी ॥ आत्मा कारण संतदृष्टिस दिसे जो तंतु सर्वांबरीं ॥ त्याशीं सर्व निशा निशापतिसुखी ज्या क्रीड ती सुंदरी ॥त्यांला धन्य किती ह्मणूं त्रिभुवना ज्यांची कथा उद्धरी ॥१९॥ कामी लोक तयांसही निज-कथा प्रीतिप्रद श्रीहरी ॥ विश्वोद्धार निमित्त गोपललनाक्रीडा विचित्रा करी ॥ ऐसें आपणही करूं ह्मणउनी जो कां अपेक्षा धरी ॥ थोडेसें विषतो गळां न गिरवी कांहो शिवाचे परी ॥ २०॥ गोपींतें रतिलाभ देउनि सदा जो ऊर्ध्वरेता हरी ॥ तेव्हां तत्पति मानिती निजभुजीं आलिंगिल्या सुंदरी ॥ जो लक्ष्मीपति नित्यमुक्त करिती जे मूढ त्याची सरी ॥ ते तोंडें वणवा पिऊं नह्मणती कांहो तयाचे परी ॥ २१॥ गोपींच्या मदन-श्रमें करुनि जो आला उबारा हरी ॥ कालिंदीसलिलामधें गजगतीं संगेंचि लीला करी ॥ संगें गोळणि मागुती उपवनीं त्यांशीं रमे श्रीहरी ॥ भाग्यें गोपवधूंचिया क्रमिलिया ऐशा बहू शार्वरी ॥ २२॥ गोपीनाथकथारुची सु-

जनहो घ्या आधु लाल्या मना ॥ श्रृंगारामृत हेंचि घ्या त्यजुनियां दुर्वासना कामना ॥ गोपींतें अधरामृतें कलियुगीं नामामृतें वामना ॥ कें लें धन्य तया तुह्मी फुकट कां नेघा जगज्जीवना ॥ २३ ॥ जो नेणे विषयाविणें रुचि तया आह्मां तुह्मां कारणें ॥ केला गोपवधू विलास रस हा विख्यात नारायणें ॥त्याही ऊपरि काव्य नाटक मिषें श्रृंगार जो पाहणें ॥ या श्रीकृष्ण-कथामृतीं न रमणें धिक् धिक् तयाचें जिणें॥ २४ ॥गाईचें शिशु ते पश्रू परिसुधा ते नों स्रवे त्या मिसें ॥ कर्में आचरती समस्तहि ऋषी वेदोदितें त्या रसें ॥ लोकोद्धार निमित्त गोपललना संगें मुकुंदें असें ॥ केलें त्या चरितामृता शुकमुखें राजर्षि प्याले तसे ॥ २५ ॥ देतांही विषपावली अमृतता ते राक्षसी पूतना ॥ नीवी-मोक्ष अपेक्षितांचि चढल्या वैकुंठ गोपांगना ॥ द्वेषें दानव शत्रु दैत्य तरले ऐशा जगज्जीवना॥ घ्या प्रेमें श्रवणेंकरूनि ह्रदयीं हे वामनप्रार्थना ॥ २६ ॥ इति रासक्रीडा समाप्त॥

---

# वामन पंडितकृत ध्यानमाळा.

वसंततिलका- वंदूनियां जलधिजा-पतिच्या पदांतें॥ वर्णीन त्या हरिचिया तनुसंपदांतें॥ बोले मुनी कपिल भागवतीं स्ववाचे॥ मातेस तेचि गुण गाइन केशवाचे॥ १॥ ध्यावें बरें हरिचिया पदपंकजांतें ॥ वज्रांकुशध्वजसरोरुह अंक ज्यांतें॥ आरक्त वर्तुळ नखें ह्रदयीं प्रभा ते ॥ नाशी अनादि तम सूर्य तसा प्रभातें॥ २॥ प्रक्षालितां चरण ते शिव त्या जळाला ॥ घेतां शिरीं गरळ दाह निवे जळाला॥ माथां धरूनि शिव तें शिवनीर जाला॥ ध्यावें असें स्मरत त्या पदनीर जाला ॥ ३ ॥ मांडीवरी चरण सुंदर पाद-पद्मा ॥ पासूनि जानुवरि ठेवुनि नित्य पद्मा॥ प्रीती करूनि चुरिते जननी जनाची॥ माता विधीचिहि वधू भवभंजनाची॥ ४ ॥ ज्या मांडिया खगभुजांवरि वर्तमाना॥ ज्या सांवळ्या अतसिका-कुसुमा-समाना॥ पीतांबरावरि करी अतिरम्य कांची॥ पंक्ती जिला

मणि मया लघुघंटिकांची ५ नाभी-ह्रदीं कमळपुत्र विरिंचि ज्यांत त्रैलोक्य- उद्भव जया जगदंबुजांत ॥ विस्तीर्ण ऊरु नव यौवन-भाव दावी ॥ ज्या चिह्नीं उगवल्या असि भाव दावी ॥ ६ ॥ श्रीयुक्त हृत्कमल त्या भव मोचनाचें ॥ जें दे मनासि सुख वाढवि लोचनाचें ध्यावें चराऽचर नमस्कृत कंधरातें ॥ जो कौस्तुभा मिरवितो अति कंधरातें ॥ ७ ॥ जे मंदरें मथिति बाहु सुधांबुधीतें ॥ ध्यावें तया सकळ-वीर- सुधांबुधीतें ॥ धारा दहाशत सुदर्शन चक्र हातीं ॥ पद्मांत हंस करिं शंख असा पहातीं ॥ ८ ॥ कौमोदकी प्रिय गदा स्मर अंतरंगें ॥ जे मारिवल्या असुर मर्दुनि रक्त-रंगें ॥ गुंजारवें करुनि सेविति भृंगमाळा ॥ कंठीं मणी जिववितो स्थिर- जंगमाला ॥ ॥ ९ ॥ झाला स्वभृत्य करुणेंच करूनि रूपी ॥ त्याचें मुखाब्ज-सुख कोण जगीं निरूपी ॥ गंडस्थळीं मकर- कुंडल- मौक्तिकांची ॥ डोळे प्रभा सरळता अति नासिकाची ॥ १० ॥ जी ज्यांत लुब्ध कुटिलालक- भृंग जाला ॥ श्री मीनयुग्म करि ज्या वदनांबुजाला ॥ सुभ्रू मुखाब्ज नयनाब्ज-युगें करूनी ॥ शोभे जळस्थळ सरोरुह-भा हरूनी ॥ ११ ॥ ध्यावें विशेष अवलोकन लोचनाचें ॥ तापत्रया निरवि जें भव मोचनाचें ॥ सस्नेह ज्यांत अति सुंदर हास्य मंद ॥ प्रेम प्रसाद शुभ ज्यांत असे अमंद १२ शोषी अशेष भव- शोक- समुद्र वारी ॥ हांसे असा परम सुंदर दानवारी ॥ पीडा करी मुनि मनांत रिघोनि काम ॥ भ्रूमंडळें भुलवि त्यासहि पूर्ण काम ॥ १३ ॥ ध्यानास आश्रय असें अतिहास्य देवें ॥ केलें जसें इतर नाठवि जे सदैवें ॥ आरक्त दंत अधरामृत-तेज यांत ॥ ध्यावा असा स्मरत विष्णु हृदंबुजांत ॥ १४ ॥ रूपीं अशा हरिचिया जडतांचि भाव ॥ प्रेमें महा उठति सात्विक अष्टभाव ॥ तो नाठवे हरिहि मानस- हंस रूपी ॥ जाऊनियां मन बुडे निज चित्स्वरूपीं ॥ १५ ॥ हे ध्यान पद्धति चतुर्दश-रत्न-माला ॥ पायीं समर्पियली तया पुरुषोत्तमाला ॥ पद्यासि पद्यचि निघे मुखिं वामनाच्या ॥ वृत्ती असोनि हरिरूपमया मनाच्या ॥ १६ ॥ इति वामन पंडित कृत ध्यानमाला समाप्त

# अथ
## वामनपंडितकृत प्रियसुधा प्रारंभः

द्रुतविलंबित– पतिनिमित्त पती तुजला प्रिये॥ प्रिय असें ह्मणतां सहसा नये॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ १॥ पुरुषही स्व-सुखार्थ करें स्त्रिया॥ ह्मणतसे सकळांहुनि ते प्रिया॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ २॥ सुनयनें सदनें विविधें धनें॥ निज-सुखार्थ समस्तहि साधनें॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ३॥ सकळ आवडि काळ बळें तुटे॥ परि निजीं निजतान कधीं विटे॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ४॥ प्रियहि अप्रिय होय घडी घडी॥ परि कदापि नये निज नावडी॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ५॥ वळखिनें भलतें प्रिय मानिनी॥ नवल कीं प्रिय हें जन नेणती॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ६॥ निजबळें सुखही तरि सांपडे॥ बहुत जो प्रिय तो बहु आवडे॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ७॥ स्वसुख तेंचि सुषुप्तिं जसें उरे॥ तथिं तरी विषयांतहि तें स्फुरे॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ८ सुख-सुधाकर-राहु अहंकृती॥ निज ह्मणूनि तरी प्रिय मानिती परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा ॥ ९॥ नयनिं राहु शशी करितां दिसे॥ तसि अहंकृति त्यास्त उल्लसे॥ परम आवडि आपुलि आपणा॥ वळख तूं तुज ट[illegible]नि मीपणा॥ १०॥ इतर ईश्वर मानिति त्या जनां॥ निज-स[illegible]र्थचि कीं तदुपासना॥ परम आवडि आपुलि आपणा[illegible]ळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ ११॥ हरिरूपेंच करूनि नि[illegible]ता॥ मिळलि त्यासचि तो प्रिय तत्वता॥ परम आवडि [illegible]ले आपणा॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा॥ १२॥ नभ म[illegible]ल तेंचि

मठांतरीं ॥ प्रिय असा कळल्या उपरी हरी ॥ परम आवडि आपु
आपणा ॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा ॥ १३ ॥ सहज चिन्म
जोचि अहो हरी ॥ प्रिय मुकुंद असें कळल्यावरी ॥ परम आवडि
पुलि आपणा ॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा ॥ १४ ॥ कळलिया हरि
ची सकळा ऽत्मना ॥ मग कळे हरिभक्ति अखंडना ॥ परम आवडि
आपुलि आपणा ॥ वळख तूं तुज टाकुनि मीपणा ॥ १५ ॥ जड
शरीरचि आपण या भ्रमें ॥ प्रियतमे कळली स्थिर-जंगमें ॥ पर
म आवडि आपुलि आपणा ॥ वळख तूं तुज टाकुनि मीपण
भ्रम-कपाटहि तें जरि ऊघडे ॥ सुख उदंड अखंडचि सांपडे
म आवडि आपुलि आपणा ॥ वळख तूं तुज टाकुनि मीपण
प्रिय-सुधा उपदेश गिरे प्रती ॥ करुनि वामन तीस ह्मणे सती
म आवडि आपुलि आपणा ॥ वळख तूंतुज टाकुनि मीपणा ॥

समाप्त.

## वामन पंडितकृत तत्त्वमाळा.

शार्दूलविक्रीडित— श्रीनारायण निर्निमित्त उगला आहे जस
म्न्वयें ॥ तेसें विश्व तयांत हें उपजतें वस्तुस्वभावें स्वयें ॥ मा
द्रू तया मधें प्रथमता होते अजा जेधवां ॥ तेव्हां निर्गुण तें
श्वर तया ध्यावें द्विजा माधवा ॥ १ ॥ मध्यान्हीं किरणीं मृष
तसी मायाच अव्यक्त ते ॥ अव्यक्तें मग निर्गुणीं सगुणता र
ता वर्तते ॥ इच्छा सृष्टि निमित्त वृत्ति उठिली तें सूत्र तेथें क्रि
शक्तीचें बळ आगळें बळ तिन्हीं सूत्राख्य तत्तीं तया ॥ २ ॥
सृष्टि करावया उपजली शक्तिक्रिया रूपिणी ॥ जीचा वास त
णीं प्रबळ जो आधीं तयां तीं गुणीं ॥ ते चिच्छक्ति अधीन स
णिंची जे शक्ति तेथें वसे ॥ ते चिच्छक्ति करूनि यासिच मह
य राजा असें ॥ ३ ॥ तत्त्वें दोनिहि सूत्र आणखि महत्तत
वेगळीं ॥ संख्ये माजि न मोजिती श्रुतिमधें ऐसेंचि सर्व